

**लक्ष्मणराव**

राजा रायरायां बहादुर अमानतवंत.

जन्म १८-११-१७९९.

॥ श्री ॥

# इतिहासादर्श

अथवा

## श्रीमंत राजा रायरायां बहादुर,

( निजाम हैदराबाद )

यांच्या

## घराण्याचा संक्षिप्त इतिहास.

श्रीरेणुकाअंबा समर्थ.

# इतिहासादर्श

अथवा

## श्रीमंत राजा रायरायाँ बहादुर,

( निजाम हैदराबाद )

यांच्या

## घराण्याचा संक्षिप्त इतिहास.

हा

बापू राजाराम वाळूंजकर

यानें

श्रीमंतांच्या परवानगीनें

मुंबई-एज्युकेशन सोसैटीच्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

शके १८२६.

# विषयानुक्रमणिका.

# चित्रांची अनुक्रमणिका.

॥ श्रीगुरुचरणारविंदाभ्यो नमः ॥

# कर्त्यांचे चार शब्द.

इतिहास हा मनुष्याच्या अनुभवभांडारापैकीं एक अमोलिक रत्न आहे. भरतखंडांत आजपर्यंत शूर, चतुर, व दातृत्वगुणविशिष्ट असे अगणित पुरुष होऊन गेले; व त्या सर्वांचें इतिहास रूपानें अनेक ठिकाणीं वर्णनही आहे, अगदीं अर्वाचीन काळचे ह्मणजे अकबर, शहाजहान, शिवाजी, बाजीराव बल्लाळ, थोरले माधवराव पेशवे, नाना फडनवीस इत्यादींचेंही चरित्र वर्णन इतिहासरूपानें प्रसिद्ध आहे.

मला स्वभावतः इतिहास वाचण्याची आवड असल्यामुळें कधीं कधीं वाचीत असतों. वाचतां वाचतां एके दिवशीं सहज मनांत आलें कीं आपणही एकादा इतिहास लिहून यथामति देशभाषेची सेवा करावी; परंतु हा विचार झाल्यानंतर दुसरा विचार त्याचे मागोमाग आला; तो हा कीं, इतिहास कोणाचा ल्याहावा ? पुढें या ( दक्षिण—हैदराबाद ) संस्थानांतील प्रसिद्ध मुत्सदी ब्राह्मण घराणें फार दिवसांपासून निजाम सरकारच्या सेवेंत एकनिष्ठपणें राहून राज्याचा व आपला उदय करून घेतलेले श्रीमंत राजे रायरायां बहादुर यांचे घराण्याचा उर्दू भाषेंत असलेला इतिहास माझ्या दृष्टीस पडला.

तेव्हां जो विचार मनांत घोळत होता, त्यांतून मोकळा झालों, व याच इतिहासप्रसिद्ध घराण्याचा इतिहास ल्याहावा असा विचार केला. नंतर त्या संस्थानचे गादीवर असलेले परम दयाळू, धार्मिक, गुणग्राहक जे श्रीमंत राजा लक्ष्मणराव बापूसाहेब राजे रायरायां अमानतवंत बहादूर यांस विनंति केली कीं, आपल्या घराण्याचा इतिहास लिहिण्याची परवानगी मिळावी. प्रेमळ अंतःकरणानें त्यांनीं ती दिल्यावर त्याच उर्दू इतिहासाच्या व इतर दप्तरी माहितीच्या साह्यानें लिहिण्यास आरंभ केला.

लिहितांना रचनेसंबंधीं व भाषेसंबंधीं ( माझा इतिहास लिहिण्याचा पहिलाच प्रसंग असल्यामुळें ) बऱ्याच अडचणी आल्या; तेव्हां येथेंही अडलों. नंतर येथील रा. रा. भिकाजी गोपाळ जोशी मराठी असिस्टंट सिटी हायस्कूल यांच्या साह्यानें त्यांतूनही पार पडलों. तसेंच मधून मधून संस्कृत वाक्यांचा उपयोग केला आहे. त्याचें शोधन वे. शा. सं. रा. रा. काशीनाथ शास्त्री उर्फ आप्पा तुळशी यांनीं केलें.

माझी उत्सुकता पाहून मला आपल्या घराण्याचा इतिहास लिहिण्याची व वेळोवेळीं जे कागदपत्र लागतील ते दप्तरांतून मिळण्याची परवानगी दिल्याबद्दल मी श्रीमंतांचे फार फार नम्रतेनें आभार मानितों. तसेंच ग्रंथ शोधनाचे कामीं साह्य केल्याबद्दल माझे गुरुवर्य रा. रा. भिकाजी गोपाळ जोशी व वे. शा, सं. रा. रा. आप्पा तुळशी यांचे आभार मानितों.

शेवटीं ज्या भगवतीच्या कृपेनें इतिहासाचें काम निर्विघ्नपणें शेवटास गेलें, त्या श्रीरेणुका देवीस महाराजांचें आणि त्यांच्या वंशजांचें उत्तरोत्तर निजाम सरकारच्या कृपाछत्राखालीं कल्याण वृद्धिंगत होण्याची प्रार्थना करून हा लांबलेला लेख आटपतों.

शालिबंडा, हैदराबाद दक्षिण,<br>
मिति फाल्गुन शुद्ध १ शके<br>
१८२६ मंगळवार.

इतिहासकर्त्ता.

## ॥ श्रीरेणुकाअंबासमर्थ ॥

### उपोद्घात.

जगदुन्नतीच्या मुख्य कारणांत ऐतिहासिक वर्णन हें एक कारण आहे. इतिहासाच्या अवलोकनानें काय काय हित आहे, हें वर्णन करून सांगावयास नको. या जगांत तेच पुरुष धन्य आहेत कीं, जे आपल्या कर्तृत्वानें मोठ्या योग्यतेस चढतात; व आपल्या मागें आपली कीर्ति " मरावें परी कीर्तिरूपें उरावें" या श्रीसमर्थरामदासांच्या उक्तीप्रमाणें अजरामर करून सोडितात, ज्यांनीं आपल्या शौर्यानें मोठमोठीं राज्यें स्थापन केलीं, ते पूर्वीं झांकलेल्या माणिकाप्रमाणें होते, थोर महाराष्ट्राचे-स्थापक नररत्न शिरोमणी श्रीशिवाजी महाराज हे पूर्वीं यःकश्चित् एका खेडे गांवचे पाटील होते; त्यांनीं आपल्या शौर्याच्या व चातुर्याच्या बलावर स्वराज्य स्थापन करून औरंगजेबासारख्या बलाढ्य शत्रूस चकीत करून सोडिलें. त्याच प्रमाणें प्रस्तुत इतिहासाचे मूळ पुरुष " कृष्णाजीपंत भालेराव" हेही प्रथमतः कुळकर्णीच असून आपल्या ज्ञानाच्या बलावर शहाजहान बादशहाच्या दरबारांत आपला प्रवेश करून घेतला; व थेट सभासदांच्या योग्यतेपर्यंत जाऊन पोंचले. आणि अशा एका राज्याचा पाया घातला कीं, तें आज सुमारें तीनशें वर्षें त्याच योग्यतेनें चाललें आहे.

कृष्णाजीपंत हे मौजे लामगांव प्रांत देवगड ( दौलताबाद ) येथील राहणारे होते. हा गांव देवगडा पासून सुमारें दहा मैल अंतरावर आहे. कृष्णाजीपंत हे स्वभावानें फारच मन मिळाऊ, दयाळू, साधे आणि सत्यप्रिय होते. धर्मनिष्ठ इतके होते कीं, प्रातःकाळीं श्रीसूर्यास नमस्कार घातल्या वांचून अन्न-ग्रहण करीत नसत. या सर्व स्तुत्य गुणांवरून त्या प्रांतांत ते बरेच लोकप्रिय होते.

एके समयीं देवगडचे किल्लेदार ( हा एक यवन मनुष्य दिल्ली सरकारांतून किल्याचे व्यवस्थेकरितां ठेवलेला होता ) मृगये-स्तव लाम गांवावरून चालले असतां या गांवची व जवळून वहात असलेल्या ' गिरिजा ' नदीची शोभा पाहून तेथें तळ देण्याविषयीं हुकूम झाला. नंतर किल्लेदार साहेब हवा खाण्यास निघाले असतां तेथील पर्वता वरून त्या रमणीय स्थलाची शोभा पाहून चार दिवस तेथेंच राहाण्याचा हुकूम केला. शिवाय तेथें शिकारी जनावरेंही पुष्कळशीं होतीं. कृष्णाजीपंत हे तेथील कुळकर्णी असल्यामुळें किल्लेदाराची सर्व प्रकारची व्यवस्था ठेवण्याचें काम यांजकडेच आलें. पंतांनीं त्यांची व्यवस्था इतकी उत्तम ठेविली कीं, ती पाहून किल्लेदार फार संतुष्ट झाले, व त्यांनीं यांचें नांव गांव विचारून आपल्या जवळ लिहून ठेविलें.

कांहीं दिवसांनंतर दिल्लीचे बादशहाकडून देवगडच्या किल्लेदारास हिशोबाच्या व जमाबंदीच्या कागदांची मागणी आली, तेव्हां कागदपत्र तयार नाहींत व आयत्या वेळीं उत्तम

रीतीनें तयार करून देण्यासारखा जवळ कोणी मनुष्यही नाहीं; असें जाणून किल्लेदार विचारांत पडले. तेव्हां लाम गांवच्या कृष्णाजीपंतांचें अकस्मात् स्मरण होऊन त्यांस बोलाविलें, व त्यांजवांचून कागदपत्र तयार करणारा दुसरा मनुष्य मिळणार नाहीं; असें जाणून सर्व कागदपत्र त्यांच्या हातीं तयार करवून त्यांस समागमें घेऊन कागदपत्रांसह दिल्लीस गेले. तेथें गेल्यावर यांनीं तो हिशोब दरबारांत हिशोबी अधिकाऱ्यास चांगला समजावून दिला. ही कामगिरी पाहून बादशहा फार संतुष्ट झाले, व त्याबद्दल त्यांनीं त्यांस मनसब करून दिली. यांनीं आपला पुढील सर्व काळ राजसेवेंत घातला. यांच्याच वंशजांचें वर्णन पुढील इतिहासांत वर्णिलें आहे.

हा इतिहास उर्दू, फारसी, व इंग्रेजी इतिहासाच्या व इतर दप्तरी माहितीच्या आधारानें लिहिला आहे. हा ग्रंथ लिहिण्याची ज्या जगन्नियंत्याच्या कृपेनें स्फूर्ति झाली, त्याजपाशीं महाराजांचें व त्यांच्या पुढील वंशजांचें आयुष्य, कीर्ति, बल, धन यांची वृद्धि होण्याविषयीं प्रार्थना करून वाचकांची रजा घेतों.



चित्रशाळा प्रेस पुणें.

हिज हायनेस दि. निझाम नवाब मिर महबूब अलिखां
बहादूर जी. सी. एस. आय. बादशाह
हैदराबाद दखन.

# हैदराबाद ( दक्षिण ) चे सांप्रतचे हुजूर निजामसरकार यांची संक्षिप्त माहिती.

हुजूर पूरनूर नवाब मीर महबूब अलिखां बहादुर यांचा जन्म मिति श्रावण शुद्ध ८ शके १७८८ शनिवारीं झाला. हे या संस्थानचे सहावे अधिकारी ( असफजाह ) आहेत. वडील निवर्तल्यानंतर आपल्या वयाच्या तिसऱ्या वर्षी शके १७९१ त हे गादीवर बसले. यांचा राज्यारोहण समारंभ हिंदुस्थानचे माजि प्रतिनिधि ( व्हाइसरॉय ) लॉर्ड रीपन यांच्या हस्तें मोठ्या थाटानें मिति माघ शुद्ध ९ शके १८०५ मंगळवारीं दिवसा साडे नऊ वाजतां झाला. त्यांत ह्यांस जी. सी. एस. आय. ही पदवी २१ तोफांच्या सलामीच्या मानासह मिळाली.

यांच्या अमलांत हिंदुस्थानचे सर्व प्रतिनिधि लॉर्ड रीपन, लॉर्ड डफरीन, लॉर्ड ल्यांडसडाउन, लॉर्ड एलजिन, लॉर्ड कर्झन हे येथें येऊन हुजूर निजाम सरकारचा पाहुणचार घेऊन गेले. त्याचप्रमाणें डयूक आणि डचेस ऑफ कनॉट, माजि प्रिन्स अलबर्त व्हिक्टर, सांप्रतचे रशियाचे झार, आस्त्रियाचे राजपुत्र, डेन्मार्कचे युवराज, ग्रीसचे युवराज, व सयामचे राजपुत्र इत्यादि बडी बडी मंडळी यांचा पाहुणचाराचा लाभ घेऊन गेली.

यांच्या अमलांत आजपर्यंत सहा मुख्य प्रधान झाले.

१ सर सालारजंग पहिले शके १७७४ ते १८०५.

२ महाराजा नरेंद्र बहादुर शके १८०५ ते ६.

३. सर सालारजंग दुसरे इमादुःसल्तनत शके १८०६ ते १८०९.

४. सर अस्मानजहां बहादुर शके १८०९ ते १५.

५. सर विकारूल उमरा बहादुर शके १८१५ ते २४.

६. सांप्रतचे महाराजा एमीनुःसल्तनत सर कृष्णप्रसाद बहादुर शके १८२४.

शके १८२४ (इ. स. १९०३ ) त दिल्ली दरबारच्या वेळीं हिंदुस्थान सरकाराकडून निजामसरकारास जि. सी. बी. ही बहुमानाची पदवी मिळाली. ही पदवी आजपर्यंत कोणत्याही नेटिव राजांस मिळाली नव्हती. या सरकारास शिकारीचा नाद फार आहे. प्रतिउन्हाळ्यांत वरंगळ प्रांतांतील पाखाल नांवाच्या अरण्यांत जात असतात. या ठिकाणीं एक मोठें विस्तीर्ण तळें आहे. त्याचा परीघ सुमारें पस्तिस मैल आहे. हे सरकार आपल्या प्रजेचें पालन फारच न्यायानें व ममतेनें करितात; व त्याबद्दल त्यांची प्रजाही त्यांस फार मान देऊन त्यांचें आयुष्य, कीर्ति, बल, धन, वृद्धिंगत होण्यासाठीं परमेश्वरापाशीं प्रार्थना करीत असते.

यांच्या प्रजावात्सल्याचें एक साधारण उदाहरण असें आहे कीं, ज्यावेळीं औरंगाबाद प्रांतांत दुष्काळ पडला होता, तेव्हां

यांनीं रेविन्यु आफिसरांस असा हुकूम दिला होता कीं, " आधींच दुष्काळांत प्रजेस खाणें पिणें मिळण्याची पंचाईत आहे, व त्यावर सारा वसूल करण्याकरितां तगादा केला तर त्यांनीं द्यावा कोठून ? अशा अडचणींत प्रजेस घालण्यापेक्षां एक वर्षाचा सारा वसूल न झाला तरी चालेल. ह्मणून तुह्मी प्रजेस साऱ्याचे बाबतींत अगदीं त्रास न देतां योग्यतेनुसार सारा माफ करावा. " या शिवाय ज्यांस अन्नवस्त्र मिळणें व मिळविणें अशक्य होतें, त्यांस अन्नवस्त्र पुरविण्याकरितां सरकारी खजिन्यांतून त्या त्या प्रांतांत पैसा पाठवून प्रजापालन फारच उत्कृष्ट रीतीनें केलें. त्याबद्दल या सरकारचें फारच औदार्य या प्रांतांत वर्णन करीत आहेत.

धार्मिक बाबतींत या सरकारचें वर्णन जितकें करावें तितकें थोडें आहे. यांच्या राज्यांत हिंदु मुसलमान या दोन्ही जाती समान मानिल्या जातात. याचें चांगलें उदाहरण हें आहे कीं, यांच्या कारकीर्दींत दोन हिंदु मुख्य प्रधान झाले. हिंदुस्थानांतील अनेक ठिकाणीं नेहमीं अलिकडे फार तंटे होतात; पण या हैदराबाद शहरांत राजा व प्रजा यांचा स्वामिसेवकभाव आहे; त्या ठिकाणीं कोणाच्या स्वप्नींही द्वेषबुद्धि वास करीत नाहीं. तेव्हां अशा राजाचें कोणती प्रजा अंतःकरण पूर्वक कल्याण चिंतणार नाहीं ? अर्थात् सर्व प्रजा निरंतर त्यांचें कल्याण चिंतीत असते. यापेक्षां अधिक वर्णन करून खऱ्या गुणांस अतिशयोक्तीनें लोपविणें नीट नाहीं असें जाणून हा लेख येथेंच संपवितों.

या संस्थानाचे यांच्या पूर्वींचे अधिकारी खालीं लिहिल्या अनुक्रमानें आहेत.

१. हुजूर निजाम उल्मुल्क बहादुर असफजाह पहिले (दिल्लीचे मुख्य वजीर), शके १६३४ ते १६७०.

२. हुजूर नवाब नासरजंग बहादुर शके १६७०.

३. हुजूर नवाब मुझफरजंग बहादुर, शके १६७०।७२.

४. हुजूर नवाब सलाबतजंग बहादुर असफद्दौला, शके १६७२ ते १६८३.

५. हुजूर नवाब निजामअलिखां बहादुर, आसफजाह दुसरे; शके १६८३ ते १७२५.

६. हुजूर नवाब सिकंदरजाह बहादुर, असफजाह तिसरे; शके १७२५ ते १७५१.

७. हुजूर नवाब नासरद्दौला बहादुर, असफजाह चौथे; शके १७५१ ते १७७९.

८. हुजूर नवाब आफझलउद्दौला बहादुर, आसफजाह पांचवे; शके १७७९ ते १७९१.

९. सांप्रतचे नवाब मीर महबुबअलिखा बहादुर, असफ-जाह ६ वे; शके १७९१.

या सरकारास एक पुत्र आहे त्याचें नांव नवाब मीर उस्मान अलिखां बहादुर, असें आहे. यांचा जन्म मिती चैत्र शुद्ध २ शके १८०८ मंगळवारीं रात्रीं साडे आठ वाजतां झाला.

हैदराबाद संस्थानचें क्षेत्रफळ सुमारें एकलक्ष चौरस मैल आहे. लोकसंख्या सुमारें दीडकोटी आहे. या संस्थानचें एकंदर उत्पन्न सुमारें सात कोटी आहे. खर्चाच्या मुख्य बाबतीं-पैकीं विद्याखात्याकडे सुमारें आठलक्ष, वैद्यकखात्याकडे सुमारें सात लक्ष, पोलीस खात्याकडे सुमारें तीस लक्ष, लष्करी-खात्याकडे सुमारें सत्तर लक्ष. याप्रमाणें मुख्य लोकोपयोगी बाबी आहेत. या संस्थानच्या सरकारीं खजिन्यांतून हुजूर नि-जामसरकारच्या खानगी खर्चाकरितां सालिना सुमारें पन्नास लक्ष रुपये दिले जातात. याशिवाय यांच्या खानगीच्या एकंदर खर्चाकरितां सालिना सुमोंर सत्तर लक्षांचा मुलूख निराळा तो-डून दिला आहे त्यास सरफ खास असें ह्मणतात. या खर्चांतून त्यांच्या खानगी लष्करी खर्चाकडे सुमारें दहा लक्ष रुपये खर्च होतात.

यांच्या राजधानीचें मुख्य शहर हैदराबाद आहे. हें मुसा न-दीच्या कांठीं असून याची लोकसंख्या सुमारें सहा लक्ष आहे. शहराची लांबी सुमारें दक्षिणोत्तर वीस मैल आहे, व रुंदी पूर्व-पश्चिम सुमारें तीन मैल आहे. या शहरची हवा उष्ण आहे. पा-ण्यांत पाचकता आहे. या ठिकाणीं पिण्याचे पाण्याची पूर्वी फार टंचाई होती. शके १८१०चे सुमारास सिकंदराबादचे तळ्याचें पाणी आ-णवून छावणी रेसिडेन्सी, बेगमबाजार, सिद्दीअंबरबाजार, अफ-झलगंज इत्यादी ठिकाणीं पाण्याची समृद्धि केली आहे. ( हें तळें शहरचे उत्तरेस आहे ) शहरांत मीरअलम तळ्याचें पाणी पोंच-विलें आहे, व ज्या ठिकाणीं हें पाणी चढत नाहीं त्या ठिकाणीं

सर अस्मान्‌जहांनीं बांधलेल्या 'उमदासागर' नांवाच्या तळ्याचें पाणी येण्यास सुरवात झाली आहे. हें संस्थान देशी राज्यांत पहिल्या प्रतीचें आहे. हैदराबाद शहर हिंदुस्थानांत चौथ्या प्रतीचें आहे. हें महंमद कुली कुतुबनें शके १५०२त वसविलें. त्या वेळीं यास भागानगर ह्मणत असत. ( गोंवळकोंडचा बादशाह महंमद कुली कुतुब याची प्रीतींतली भागावती नांवाची हिंदु स्त्री होती. तिच्या मरणानंतर तिच्या स्मरणाकरितां एक शहर वसविलें, त्यास भागानगर असें ह्मणतात. कोणी त्यास भाग्यनगर असें ह्मणतात. पुढें कुलीकुतुबचा पुत्र हैदर या शहरीं राहूं लागला म्हणून त्यानें त्यास आपलें नांव दिलें. तेव्हांपासून त्यास हैदराबाद असें म्हणूं लागले. )

हैदराबादच्या पश्चिमेस गोंवळकोंडा नांवाचा किल्ला सहा मैल अंतरावर आहे. त्यांत सध्यां निजामसरकारची फौज रहाते.

हें ठिकाण हिऱ्यांविषयीं फार प्रसिद्ध आहे. पंजाबचे प्रसिद्ध महाराजा रणजितसिंग ( लॉयन ऑफ पंजाब )याजपासून इंग्रेजसरकारास मिळालेला जो अद्वितीय "कोहिनूर" नांवाचा हिरा तो याच ठिकाणीं सांपडला आहे.

या संस्थानचे राज्यव्यवस्थेकरितां चार प्रांत ( सुभे ) केले आहेत. १. औरंगाबाद, २. कलबुर्गा, ३. बेदर, ४. वरंगल. वसुलाचे सोईकरितां सोळा जिल्हे केले आहेत. औरंगाबादेपासून सुमारें आठ मैलांवर देवगड ( दौलताबाद ) नांवाचा डोंगरी बळकट प्रख्यात किल्ला आहे. हा किल्ला पहाण्याकरितां

दूरदूरचे मोठमोठे लोक येतात. परदेशी आणि परद्वीपस्थ जे कोणी या संस्थानांत प्रवास करितात ते हा किल्ला पाहिल्याशिवाय जात नाहींत. या किल्ल्यापासून चार मैलांवर जोतिलिंगांपैकीं प्रसिद्ध श्रीघृष्णेश्वर नांवाचें वेरुळास जोतिलिंग आहे. वेरूळ या गांवीं डोंगरामध्यें कोरींव लेणीं आहेत. हीं लेणीं इतकीं सुंदर, भव्य, नाजुक, व आश्चर्यकारक आहेत कीं, तीं पाहिल्याबरोबर पहाणाऱ्यास कारागिरांचे कौशल्याचें वर्णन अतर्क्य आहे असें वाटतें. परदेशी लोक हीं लेणीं पहातात तेव्हां त्यांस असें वाटतें कीं, आम्ही इतर बाबतींत कितिही सुधारलों तरी शिल्पशास्त्रांत हिंदुलोकांची बरोबरी कधींही करतां येणार नाहीं, याची साक्ष हीं लेणींच बस्स आहेत. याशिवाय या राज्यांत अजिंठा इत्यादि ठिकाणींही दुसरीं कोरींव लेणीं आहेत.

# श्रीरेणुका अंबा समर्थ.

# श्रीमंत महाराज राजे राय रायां बहादुर अमानतवंत यांच्या घराण्याचा संक्षिप्त इतिहास.

## प्रकरण १ लें.

### कृष्णाजीपंत.

( श० १५३० ते १६१० ).

कृष्णाजीपंत हे आश्वलायन शाखी, अत्रिगोत्री, महाराष्ट्र देशस्थ ब्राह्मण भालेराव उपनांवाचे होते. हे मौजे लामगांव प्रगणे टांकळी प्रांत देवगड येथील राहणारे होते. ( हा गांव गिरिजा नदीच्या कांठीं आहे ) हे लामगांव व वीरमगांवचे वतनी कुळकर्णी होते. यांचा जन्म शके १५३०त झाला. शहाजहान बादशाहच्या कारकीर्दींत शके १५७५ त हे देवगडच्या किल्लेदाराबरोबर दिल्लीस गेले. तेथें यांनीं आपल्या विद्येच्या व चातुर्याच्या बळावर बादशाहच्या सभासदांची योग्यता संपादिली. हे शके १६१० त आपल्या वयाच्या ८० व्या वर्षीं स्वर्गस्थ झाले. यांच्या पत्नीचें नांव राधाबाई असें होतें.

# प्रकरण २ रें.

## मोरोपंत.

( श० १६९३ ते १६७१ ).

हे आपले बंधू नारोपंत यांसह दिल्लीच्या बादशहाची वडिलार्जित मनसब उपभोगीत असत. यांनीं आपल्या गुणांनीं तेथील मुख्य प्रधानाची (निजाम उल्मुल्क) प्रीति संपादन करून घेतली. याप्रमाणें कालक्रम चालला असतां तेथील मुख्य प्रधान राजकीय बाबतींत व इतर बाबतींत यांची सलामसलत घेऊं लागले; हें दरबारी लोकांस सहन न होऊन ते या उभयतां बंधूंचा द्वेष करूं लागले.

शके १६६३ त दिल्लीचे मुख्य प्रधानानें दक्षिणचे सुभ्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं आपला वडील पुत्र नासिरजंग यास ठेविलें होतें. त्यानें आपल्या बापाच्या विरुद्ध दक्षिणेंत बंड केलें. तें मोडण्याकरितां निजाम उल्मुल्क हे दक्षिणेंत येतांना त्यांनीं आपल्या बरोबर या बंधुद्वयांस आणिलें. बंड मोडून या दोघां बंधूंस हैदराबादेस ठेवून आपण दिल्लीस परत गेले. जातांना या बंधूं-पैकीं वडील जे मोरोपंत ह्यांस आपल्या राज्याचीं पंतअमात्याचीं (पेषकारीचीं) वस्त्रें शके १६७१ त दिलीं व येथील बंदोबस्त त्याजवरच सोंपविला. त्या दिवसापासून ह्यांनीं आपल्या रहाण्याचें ठिकाण हैदराबाद शहर केलें. नंतर थोड्याच दिवसांत मोरोपंत स्वर्गस्थ झाले. यांच्या कुटुंबाचें नांव गंगाबाई असें होतें.

# प्रकरण ३ रें.

## नारोपंत ( नरहरपंत ).

( श० १६०१ ते १६७३ ).

हे आपल्या बंधूस सर्व राजकीय व इतर कामांत साह्य करीत असत. यांचे बंधू ( मोरोपंत ) निपुत्रिक स्वर्गस्थ झाल्यामुळें आपला वडील पुत्र जो शंकराजीपंत यास वडिलार्जित सर्व हक्क देववून त्यांच्या तर्फेनें आपण सर्व काम पहात असत. हे शके १६७३ त स्वर्गस्थ झाले. यांच्या सहधर्मिणीचें नांव उमाबाई असें होतें.

# प्रकरण ४ थें.

## हैदराबादचे नवाब सलाबतजंग बहादुर यांची कारकीर्द.

### शंकराजीपंत ( शंकरदास ).

( श० १६३९ ते १६८१ ).

नवाब अमीर उल् मुमालिकअसफद्दौला सैयद महंमदखां सलाबतजंग यांच्या वेळीं ह्मणजे शके १६७२ त शंकराजीपंतास सहा प्रांतांची ( १. प्रांत औरंगाबाद, २. प्रांत हैदराबाद, कर्नाटक. ३. प्रांत वऱ्हाड वर घाट, तळ घाट, (बाला घाट पांया घाट), ४. प्रांत विजापूर, ५. प्रांत बेदर, ६. प्रांत खानदेश ) दप्तरदारी मिळाली.

शंकराजीपंतास स्वभावतः देवीचे चरणीं निष्ठा होती. टांकळी-पासून दोन तीन कोसांवर पश्चिमेस डोंगरावर एक ‘श्रीगिरिजादेवी’ नांवाचें फार जुनें प्रसिद्ध जागृत असें देवीचें स्थान आहे. ( याच पर्वतापासून ‘गिरिजा’ नांवाची नदी निघते. तिच्याच कांठीं लामगांव आहे.) त्या ठिकाणीं शंकराजी पंतांनीं प्रत्यहीं प्रातःकाळीं जाऊन सप्तशतीचे नियमित पाठ करून घरीं यावें असा पाठ होता. एके दिवशीं पूर्ण निष्ठा व कडकडीत तपश्चर्या पाहून देवी संतुष्ट झाली; आणि शंकराजीपंतास हांक मारून विचारिती झाली कीं, तूं किमर्थ श्रम करीत आहेस? तुला काय पाहिजे? हें वचन ऐकून

शंकराजीपंत न घाबरतां उत्तर करितात कीं, मी थोराचे पदरीं आहें. तसाच मलाही मोठेपणा मिळावा अशी इच्छा आहे. देवी ह्मणाली ठीक आहे.

**पंत**.—मी पालखीपदस्थ व्हावें.

**देवी**.—तुझ्या प्रारब्धीं नाहीं.

**पंत**.—पारब्ध तुमच्या कृपेहून निराळें नाहीं.

**देवी**—तुझ्या वंशांत एक पिढी सोडून पुढें मिळेल.

इतकें संभाषण झाल्यावर शंकराजीपंत मनांत ह्मणतात कीं, कृपा झाल्यावर प्रारब्ध कां फिरूं नये, मीं इतके श्रम करून देवीची सेवा करूनही मला कांहीं प्राप्ती झाली नाहीं. हें सर्व व्यर्थ जाणून ह्यांस प्रपंच्याविषयीं औदासिन्य झालें, व त्याच चिंतेंत व्यग्र होऊन प्रकृति बिघडत चालली. शेवटीं यांनीं आश्रम घेतला.

एके दिवशीं शंकराजीपंत निद्रित असतां देवीनें स्वप्नांत येऊन असें सांगितलें कीं, तुला मजविषयीं औदासिन्य झालें आहे. तरी माझी तुझ्या वंशजांवर पूर्ण कृपा आहे. मात्र इतकी गोष्ट लक्ष्यांत ठेव कीं, संस्थानच्या गादीवर असलेल्या पुरुषांनीं माझें दर्शन घेऊं नये. इतकें स्वप्न पाहून शंकराजीपंत जागृत झाले, व मनांत संतोष मानिते झाले.

आश्रम घेतल्यानंतर शके १६८१ त आपल्या वयाच्या ४६ वे वर्षीं हे समाधिस्थ झाले.

पुढें देवीनें वचनाशी दिल्याप्रमाणें शंकराजीपंतापासून तिसरी पिढी जे श्रीमंत राजा शामराज बहादुर यांस हीं सर्व राजचिन्हें ( शंकराजीपंतांनीं इच्छिलेलीं ) मिळून त्यांची मोठी कीर्ति झाली. यांच्या गृहिणीचें नांव पार्वतीबाई असें होतें.

शंकराजीपंतांची समाधि येथील यांच्या एका बागेंत आहे.

# प्रकरण ५ वें.

## नवाब सलाबतजंग बहादुर व नवाब मीर निजाम अलिखां असफजाह दुसरे यांची कारकीर्द.

### धोंडाजीपंत ( गणेशदास ).

( श० १६५० ते १७०९ )

यांचे वडील शंकराजीपंत यांनीं संन्यासाश्रम स्वीकारल्यामुळें हेच सर्व काम पहात असत. वडील समाधिस्त झाल्यानंतर यांच्या नांवानें सहा प्रांतांची दप्तरदारी झाली. मिती वैशाख वद्य २ शके १६८१ त मौजे रायपूर प्रगणे खानापूर प्रांत औरंगाबाद व मिती वैशाख वद्य ४ शके १६८९ त मौजे सांगवी प्रगणे टांकळी प्रांत औरंगाबाद या दोन गांवच्या जहागिरिच्या सनदा श्रीमंत थोरले माधवराव साहेब पेशवे पंत प्रधान यांनीं मुकाम बेंगलोर प्रांत कर्नाटक ( हल्लीं संस्थान म्हैसूर ) येथें ह्यांस करून दिली. त्या वेळीं हे म्हैसूरवर स्वारी करण्या करितां निजाम सरकाराकडून पेशवे सरकारास साह्य करण्यास गेले होते.

मिती पौष वद्य ११ शके १६८८ त दोनशें रुपयांची मनसब निजाम सरकारानें ह्यांस करून दिली. मिति वैशाख वद्य ११ शके १६८९ त सातशेंची मनसब व 'राय' ही पदवी मिळाली.

पुढे मिति ज्येष्ठ शुद्ध ६ शके १६९० त निजाम सरकाराकडून ह्यांस एक हजारांची मनसब व 'रायरायां दियानतराम' ही पदवी मिळाली. मिति वैशाख शु० ८ शके १६९५ त ह्यांस निजाम सरकारानें नायब दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. यांच्या वतनाचें जें मौजे लामगांव प्रगणे टांकळी प्रांत औरंगाबाद या गांवची सनद मिति भाद्रपद वद्य १० शके १६९६ त श्रीमंत सवाई माधवराव पेशवे पंत प्रधान यांनीं किल्ले पुरंदर येथें करून दिली. त्या वेळीं हे निजाम सरकाराकडून पेशवे सरकारचे मुख्य मुत्सद्दी नानाफडनविस याजबरोबर राजकीय बाबतींत कांहीं खलबत करण्यास गेले होते.

शके १७०० ह्या वर्षीं श्रावण शुद्ध १ स निजाम सरकाराकडून दोन हजारांची मनसब, निशाण, डंका व 'राजा' ही पदवी मिळाली. मिति आश्विन शुद्ध १० शके १७०१ त यांस तीन हजारांची मनसब व 'दियानतवंत' ही पदवी मिळाली.

शके १७०२ त निजाम सरकार शिकारीहून परत आल्यानंतर चार हजारांची मनसब व 'बहादुर' ही पदवी मिळाली. ( निजामसरकारची स्वारी शिकारीवर असतां एके ठिकाणीं स्वारी सायंकाळीं शिकारीनंतर आपल्या शिबिरांत गेली, व जवळचे लोक जेवणाखाण्याचे कामांत गुंतले होते. अशा संधींत पाण्याचे ठिकाणीं दहावीस लोकांची एकच गर्दी होऊन आरडाओरड झाली. पंत मजकूरची जागा पाण्याचे जवळच होती. ही गर्दी कशाची आहे, ह्मणून सडे हातांत तलवार घेऊन पाहण्यास गेले तों त्या ठिकाणीं एक भला मोठा वाघ इकडून तिकडे फिरतांना पाहिला. कोणी बंदुकीची तयारी करीत आहेत, कोणी आपलें हत्यार शोधित आहेत हें पाहून एकदम पंत मजकूरांनीं आपला खड्ग

नग्न करून त्याचे अंगावर धांवले व त्याचें उड्या मारण्याचें अवसान टाकून असा हात मारला कीं, एका हाताबरोबर शरिरापासून मुंडकें लटकूं लागलें. घाईघाईनें दुसरा वार करून पोट फाडिलें, तेव्हां तें भयंकर श्वापद प्रेतवत् होऊन खालीं पडलें. हें ब्राह्मणाचें शौर्य पाहून निजामसरकार फार खुष झाले, व ही पदवी मोठ्या आनंदानें दिली.)

पुढें त्याच वर्षीं मिति कार्तिक वद्य ९ स जगदेवराव पंतअमात्य (पेषकार) यांच्या जागीं सरकारांनीं ह्यांस नेमिलें.

मिति आश्विन शुद्ध ९ शके १७०३ ह्या वर्षीं एहतेषाम्जंग बोधन किल्ल्याचे अधिकारी यानें सरकार विरुद्ध बंड केलें होतें, तें मोडण्याकरितां सरकारनीं ह्यांस पाठविलें होतें. ह्यांनीं बंड मोडून किल्ला सर केला; तेव्हां यांस निजामसरकारांनीं आपली खास तलवार, सरपेंच, अलिबंद (गळ्यांत घालण्याचा पट्टा) इतके अलंकार दिले.

शके १७०४ ह्या वर्षीं जेव्हां निजामसरकार बंडखोर लोकांस हटवून त्यांचा निर्मळ किल्ला जिंकून आले, तेव्हां येथें ही जमीनदार लोकांनीं बंड केलें होतें, तें सरकारच्या आज्ञेवरून धोंडाजीपंतानीं आपले कनिष्ट बंधू नानाजीपंत (हे फार लोकप्रिय होते) यांच्या साह्यानें मोडिलें, व जमीनदार लोकांची समजूत करून त्यांजपासून सारा मोठ्या युक्तीनें वसूल केला. ही कामगिरी पाहून सरकार खुष होऊन त्यांनीं या उभयतां बंधूंस योग्य बक्षिस देऊन आपला आनंद प्रदर्शित केला. हे मिति पौष शुद्ध १ शके १७०५ त आपल्या वयाच्या ९९ व्या वर्षी स्वर्गस्थ झाले. यांच्या पत्नीचें नांव रमाबाई असें होतें.

# प्रकरण ६ वें.

## नानाजीपंत ( नानकराम ).

( श० १६९२ ते १७०७ )

हे आपले वडील बंधू धोंडाजीपंत यांचे वेळीं नानकराम या नांवानें प्रसिद्ध होते, यांस मिति माघ वद्य १४ शके १६८३ त श्रीमंत पेशवे पंत प्रधान यांजकडून अडगांव इत्यादि अकरा गांवची जहागिर मिळाली. मिति वैशाख शुद्ध १५ शके १६८८ त निजामसरकाराकडून यांस चार प्रांतांची (१. प्रांत औरंगाबाद, २. प्रांत विजापूर, ३. प्रांत वऱ्हाड वरघाट, तळघाट (बालांघाट, पायांघाट), ४. प्रांत खानदेश ) मोहरीरी मिळाली. त्याच वर्षीं मिति पौष वद्य ११स दोनशेंची मनसब मिळाली. मिति वैशाख शुद्ध ८ शके १६८९ त तीनशें रुपयांची मनसब मिळाली. पुढें वैशाख वद्य ४ स मुकाम बेंगलोर प्रांत कर्नाटक येथें श्री. पेशवे सरकाराकडून मौजे रेल प्रगणे कन्नड प्रांत औरंगाबादच्या जहागिरीची सनद मिळाली.

मिति माघ शुद्ध १२ स निजाम सरकाराकडून पांचशेंची मनसब व ‘ राय ’ ही पदवी मिळाली. मिति माघ वद्य ३ शके १६९३ त सातशेंची मनसब व ‘ अमानतवंत ’ ही पदवी मिळाली. मिति भाद्रपद शुद्ध ६ शके १७०० या वर्षीं एक हजारांची मनसब व ‘ राजा ’ ही पदवी मिळाली. मिति आश्विन शुद्ध ९ शके १७०३ त तीन हजारांची मनसब व तिचा इतमाम अलम, नकारा व जडावी सरपेंच सह मिळाली. नंतर ह आपले वडील बंधू निवर्तल्यावर यांच्या

जागीं त्यांचे चिरंजीव ( स्वतःचे पुतणे ) रेणुकादास यांची स्थापना करून त्यांच्या तर्फे आपण काम पाहूं लागले.

हे आपल्या वयाच्या ९९ व्या वर्षीं शके १७०७ त मार्गशीर्ष वद्य १० सोमवारीं स्वर्गस्थ झाले. हें फार लोकप्रिय असल्यामुळें शहरांतील हिंदु मुसलमान जातींचे हजारों लोक यांच्या प्रेतयात्रेस गेले होते. यांस दोन स्त्रिया होत्या. त्यांचीं नांवें १ काशीबाई, २ सावित्रीबाई. सावित्रीबाईच्या ठाईं यांस २ कन्या झाल्या. १ मुक्ताबाई, २ तुकाबाई.

पतिनिधनकाल समीप आल्यावर दुःखातिशयानें, भावी वियोगजन्यदुःख मूर्तिमंत उभें राहिल्यावर उभयतां स्त्रियांनीं आपला प्राणत्याग करून घेतला. सवर्तीमध्यें अकृत्रिम अशा रीतीचा प्रेमभाव सृष्टीमध्यें विरळाच दृष्टीस पडतो.

# प्रकरण ७ वें.

## उमाकांतराव.

(श० १६८१ ते १७०१)

ह्यांस यांचे वडील धोंडाजीपंत यांचे हयातींत शके १६८८ पौष वद्य ११ स शंभर रुपयांची मनसब व मिति वैशाख शुद्ध ८ शके १६८९ त दोनशें रुपयांची मनसब मिळाली. पुढें मिति वैशाख शुद्ध १३ शके १७०१ यांस एक हजारांची मनसब व 'राय' ही पदवी मिळाली. हे त्याच वर्षी आपल्या वयाच्या विसावे वर्षी स्वर्गस्थ झाले. याच्या अकालीं मृत्यूनें यांच्या वडिलांस फार दुःख झालें.

यांच्या पत्नीचें नांव गंगाबाई असें होतें.

# प्रकरण ८ वें.

## हैदराबाद नवाब मीर निजामअलिखां बहादुर असफजाह २ रे व नवाब सिकंदरजाह बहादुर असफजाह ३ रे यांची कारकीर्द.

### रेणुकादास ( तात्यासाहेब ).

( श० १६८७ ते १७४४ )

य थोर पुरुषाचा जन्म मिति चैत्र शुद्ध ९ शके १६८७ पार्थिव नाम संवत्सरे शनिवारीं झाला.

**श्लोक.**

॥ शके मुन्यष्टरसभूमिते सौरि दिनेऽजनि ॥
॥ चैत्रशुद्ध नवम्यां श्री रेणुकादास भूपतिः ॥

हे लहान असतांना वडिलांनी यांच्या नांवानें दिवाणी दप्तरची शिरस्तेदारी मिति श्रावण शुद्ध २ शके १६८७ त रविवारीं करून घेतली. पुढें यांस लष्करी खात्याची शिरस्तेदारी शके १७०१ त झाली. मिति चैत्र शुद्ध १३ शके १७०२ त चारशें रुपयांची मनसब झाली. त्याच वर्षी मिति श्रावण शुद्ध १० स सातशेंची मनसब व 'राय' ही पदवी मिळाली. मिति भाद्रपद शुद्ध ९ शके १७०४ त यांस एक हजारांची मनसब मिळाली.

यांचे वडिलांनंतर तीन हजारांची मनसब, निजाम सरकारच्या राज्याचीं पंत अमात्याचीं वस्त्रें, व 'रायरायां' ही पदवी अलंकारासह मिति पौष वद्य ७ शके १७०६ सोमवारीं मिळाली.



चित्रशाळा प्रेस पुणें.

श्री० राजे रेणुकादास उर्फ राजे शामराज बहादूर
राजे रायरायां अमानतवंत.

मिति भाद्रपद शुद्ध ९ शके १७०७ मंगळवारीं ' राजा दियानतवंत ' ही पदवी मिळाली. मिति भाद्रपद शुद्ध ९ शके १७०८ त पोर्चुगीज सरदार मेन्सन साहेब हैदराबादेस आले होते, त्या प्रसंगीं सरकाराकडून त्यांची यांनीं योग्य व्यवस्था ठेविल्यामुळें निजाम सरकारांनीं ह्यांस एक जोड भुजबंद देऊन आपला आनंद प्रदर्शित केला.

मिति भाद्रपद शुद्ध ९ शक १७०९ त 'बहादुर' ही पदवी मिळाली.

मिति भाद्रपद शुद्ध ९ शक १७१० त चार हजारांची मनसब मिळाली.

पुढें मिति फाल्गुन शुद्ध २ शकें १७०९ त बंडखोर लोकांचें बंड मोडून त्यांचे चिन्नूर व महादेवपूर हे दोन किल्ले घेतले, तेव्हां निजाम सरकारांनीं एक जोड दस्तबंद, जडावी सरपेंच ह्यांस बक्षिस दिलें.

मौजे रेल इत्यादि गांवांची सनद जी श्री. पेशवे सरकाराकडून यांच्या वडिलांस मिळाली होती, तीच पुन्हा यांच्या नांवानें मिति वैशाख वद्य १४ शके १७१० त झाली.

त्याच वर्षीं मिति आषाढ वद्य ८ स पांच हजारांची मनसब सरकारांतून मिळाली.

त्याच वर्षीं पुढें श्रीचा नवरात्रांचा उत्सव समीप आला असल्या कारणानें राजे साहेबानीं विचार केला कीं, सरकारी कामाच्या गडबडींत श्रीकुलेदवतेच्या उत्सवासाठीं टांकळीस जाणें होणार नाहीं व वरचेवर सरकारी कामाची निकड फार असल्यामुळें नेहमीं

जाणें होणार नाहीं, असें जाणून घरीं असलेल्या (मातापूर-च्या) कुलस्वामीनिचा तांदळा आणवून श्रीचा नवरात्र्युत्सव येथेंच करावा, असा विचार करून घरीं असलेल्या श्रीस मुकामा मुकामावर सोंवळ्या ब्राह्मणांचे टप्पे ठेवून आणवावें. याप्रमाणें दोन चार मुकाम आल्यावर देवीनें राजे बहादुरांस स्वप्नांत दृष्टांत दिला कीं, 'मला तिकडे नेण्याचे भानगडींत पडूं नये. हल्लीं तुह्मी ज्या प्रतिमेची पूजा करीत आहां तिचीच पूजा करावी, व उत्सव ही तिचाच करावा. त्यांत मला संतोष आहे.' असा दृष्टांत पाहून राजे साहेबांनीं ताबडतोब सांडणी स्वार पाठवून श्रीस आणाविणेची मनाई केली. (स्वार पोंचे पर्यंत ते ब्राह्मण दोन मुकाम अधिक आले होते) आणि दोन्ही ठिकाणीं उत्सव करण्याचें ठरविलें. त्या दिवसापासून दोन्ही ठिकाणीं सारखा उत्सव होत असतो.

मिति चैत्र शुद्ध १४ शक १७१२ त यांस झालरदार पा-लखीचा मान सरकारांतून मिळाला.

पुढें मिति भाद्रपद शुद्ध १ शके १७१३ मंगळवारीं ह्यांस मो-र्चेलचा मान मिळाला. (हा मान निजामसरकारच्या गादीच्या मालकावांचून दुसऱ्या कोणासही मिळूं शकत नाहीं)

मिति भाद्रपद शुद्ध १ शके १७१४ शनिवारीं यांस अलम्, नकारा अफताबगिरी, छत्र, झालरदार अंबारी, इत्यादि राजचिन्हें व 'शाम राज' ही बहु मानाची पदवी अलंकारांसह सरकारांतून मिळाली.

मिति माघ शुद्ध ७ शके १७१३ त निजाम सरकार गंजाम श-हराकडील राजकारणांत गुंतले होते, तेव्हां श्रीमंत राजा शामराज,

रायरायां बहादुर दियानतवंत हे हैदराबादचे दिवाण मशीर उल् मुल्क यांच्या समागमें छावणी श्रीरंगपट्टणास येथें हत्तीवर स्वार होऊन श्रीमंत पेशवे सरकारचे प्रसिद्ध सेनापती हरिपंत तात्या फडके यांच्या गोटांत जाऊन सुमारें एक प्रहर त्यांच्याशीं खलबत करीत बसले होते. याच ठिकाणीं यांनीं श्रीरंगपट्टणचा येथें नकाशा अवलोकन केला. मिति फाल्गुन शुद्ध २ शके १७१३ त श्रीरंगपट्टणच्या तहाचे वेळीं टीपू सुलतानचे दोन मुलगे जेव्हां तहामध्यें बोलाविले गेले, तेव्हां ते उभयतां मुलगे किल्ल्यांतून बाहेर येत असतां लॉर्ड कॉर्नवालीस, हरिपंत फडके, व ही हैदराबादची राजकीय मुत्सद्यांची जोडी त्यांस सामोरें गेले होते. हा जो तह झाला तो या चतुर चतुर्वर्गाच्या अनुमतानें झाला.

मिति पौष शुद्ध ९ शके १७१७ त निजामसरकारांकडून तहरीर पावआणी, ( सरकारी ऐन वसुलांतून एक रुपयास पाव आणा याप्रमाणें यांस हक्क मिळत असे ) सहा प्रांतांची सरदेशपांडेगिरी, नांदेड, कलबुर्गा, मेदक या जिल्ह्याची सर सरदेशपांडेगिरी ह्यांस मिळाली. ( ज्या ठिकाणीं सरदेशपांडे होते त्या ठिकाणीं ह्यांस सर सरदेशपांडे नेमिलें ) तसेंच सर्व तऱ्हेच्या जहागिरी जाती, ( खास ), इनामी ( इनाम ), तनखा ( खर्चा कारितां ), एजाजी ( सरकारांतून सन्मानार्थ मिळालेल्या ), निगादाप्तजमियत ( ताब्यांत असलेल्या सैन्याचे खर्चासाठीं ), तफवीज देहात ( सरकारांतून सुधारून व्यवस्थेकरितां मिळालेले गांव ), इत्यादि मिळाल्या.

खर्ड्याच्या लढाई नंतर मुख्य प्रधान मशीरउल्मुल्क ह्यांस पेशवे सरकारचे स्वाधीन केलें, त्या वेळीं ( शके १७१७ ) मुख्य प्रधानगिरीचीं वस्त्रें सरकारांतून खालील अलंकारांसह ह्यांस मिळालीं.

१. चार कीनखापाचीं ठाणें, २. दस्तार (पागोटें), ३. जडावीसरपेंच ( कलगीसह ), ४. मोत्यांचा तुरा, ५. जडावी हार ( कंठी ), ६. मोत्यांची कंठी, ७. दस्तबंदाचा जोड, ८. भुजबंद एक जोड, ९. कानांतील पाचेचा ( जमरूद ) चौकडा, १०. अलीबंद ( गळ्यांतील जडावी पट्टा ), ११. समशीर खास ( निजामसरकारची स्वतःची तलवार ).

मिति आश्विन शुद्ध १४ [illegible] १७२० त हे राजेसाहेब श्रीरामेश्वरचे यात्रेस गेले. तेव्हां आपले चिरंजीव श्री बाबूराज यांस संस्थानचे गादीवर बसवून त्यांच्या साह्यास राय त्र्यंबकपंत नांवाच्या हुशार मुत्सद्यास नेमिलें होतें.

मिति आश्विन शुद्ध ४ शके १७२६ त श्रीरामेश्वराहून परत आल्यानंतर बेदर प्रांताकडे गेले, व तेथें बेदराजवळच दरीखालीं जमीन घेऊन त्या ठिकाणीं अग्रहार नांवाचें गांव मिति भाद्रपद शुद्ध ८ शके १७२८ त वसविलें. रामेश्वराचे यात्रेहून परत येतांना तेथून एक शिवलिंग आणिलें होतें; तें ह्या गांवीं मिति माघ वद्य १४ शके १७३० सोमवारीं स्थापिलें, व त्या गांवाचें नांव शामराजपुर व शिवलिंग याचें नांव शामराजेश्वर असें ठेविलें.

## श्लोक.

॥ स्वस्ति श्री नृप शालिवाहन शके खाग्न्यश्वभू संमिते ॥
॥ वर्षे वै विभवे तपो सित चतुर्दश्यां विधोर्वासरे ॥
॥ कुर्यात्संप्रति सामराज नृपशार्दूलेन संस्थापितः ॥
॥ साम्राज्यं निज सामराज नगरे श्री सामराजेश्वरः ॥ १ ॥

त्या दिवसापासून सरकारी कागदपत्रांतही या गांवाचें नांव शाम राजपूर हेंच चालू झालें.

या गांवची सनद पूर्वींच यांनीं निजाम सरकाराकडून मिति ज्येष्ठ वद्य ९ शके १७२९ त मिळविली होती. या गांवीं पाण्याची कमतरता असल्यामुळें त्या ठिकाणाहून जवळ असलेल्या शुक्र तीर्थाचें पाणी नळाच्या द्वारें आणून गांवांत जलसमृद्धि केली. त्या योगानें हा गांव रहाण्यास फार सुखाचा व सोईचा झाला आहे. हें पाणी लोकांस शके १७३८ च्या फाल्गुन वद्य १२ स मिळूं लागलें. या ठिकाणीं प्रति महाशिवरात्रीस मोठ्या थाटाचा उत्सव होत असतो.

श्रीमंत शामराज बहादुर यांस प्रसिद्ध सत्पुरूष श्री गुंडामहाराज यांचा उपदेश झाला होता.

हे राजे साहेब मिति वैशाख वद्य ६ शके १७४४ चित्रभानु नाम संवत्सरे रविवारीं शामराजपुरांत स्वर्गस्थ झाले.

## श्लोक.

॥ शके चतुर्वेद मुनि भूमिते रवि वासरे ॥
॥ वैशाख कृष्ण षष्ठ्यां स्वर्गतः श्रीरेणुकाचरः ॥

यांच्या दहन ठिकाणीं समाधि बांधली आहे, त्यास तुळशीबाग असें ह्मणतात. ह्यांस सात स्त्रिया होत्या. त्यांचीं नांवें:—लक्ष्मीबाई, दुर्गाबाई, शामाबाई, भवानीबाई, तुळजाबाई, लक्ष्मीबाई, अंबाबाई.

यांत तिसऱ्या पत्नी शामाबाईसाहेब यांस दोन पुत्र झाले, व अंबाबाई साहेबांस चिमणा राजाराम याप्रमाणें तीन पुत्र होते.

यांच्या हयातींत पहिल्या सहा स्त्रिया परलोकवासी झाल्या. व शेवटच्या अंबाबाई साहेब ह्या शके १७६४ श्रावण शुद्ध १२ गुरुवारीं श्रीक्षेत्र नांदेड येथें स्वर्गस्थ झाल्या.

# प्रकरण ९ वें.

## आप्पाराव.

(श० १६८८ ते १७२१)

हे राजा शामराज बहादुर यांचे कनिष्ठ बंधू होत.

श्री. पेशवे सरकारांनीं ज्या जाहगिरी नानाजीपंतास दिल्या होत्या, त्या यांच्या नांवानें आश्विन वद्य १२ शके १६९६ त चालू केल्या.

निजाम सरकाराकडून यांस मिति वैशाख शुद्ध १२ शके १७०१ त तिनशेंची मनसब मिळाली. त्याच वर्षीं मिति आश्विन शुद्ध १० स पांचशेंची मनसब व 'राय' ही पदवी मिळाली. पुढें आश्विन शुद्ध ९ शके १७०३ त सातशेंची मनसब व मिति पौष वद्य ८ शके १७०५ त एक हजारांची मनसब मिळाली.

मिति आश्विन शुद्ध १० शके १७०६ त दोन हजारांची मनसब व 'दियानतराम' ही पदवी मिळाली.

यांच्या चुलत्या नंतर शके १७०७ त यांना चार प्रांतांची मोहरिरी मिळाली. (ही एक सन्मानार्थ उत्पन्नाची बाब आहे) मिति आश्विन शुद्ध ९ शके १७०८ त तीन हजारांची मनसब व 'राजा महाराजवंत' ही पदवी अलमूनकारासह मिळाली. मिति जेष्ठ वद्य १४ शके १७०९ त निजाम सरकाराचा 'पायगा खास' (खानगी सेना) चा अधिकार अलंकारासह आणि 'बहादुर'

या पदवीसह मिळाला. या लष्कराचे खर्चाकरितां सालीना अकरा लक्षांची जहागिर मिळाली. या फौजेंत स्वार, पायदळ, तोफखाना, वगैरे सर्व प्रकारचा सरंजाम असून ती फ्रेंच, पोर्चुगीज, इंग्लिश, इत्यादि सरदार लोकांकडून शिकविली होती. शके १७११ च्या निजामसरकारच्या वाढ दिवसानिमित्त ह्यांस कलगीसह एक सरपेंच मिळाला.

मिति ज्येष्ठ शुद्ध १३ शके १७१२ त झालरदार पालखी, अलम्, नकारा व अलंकार यांसह मिळाली.

मिति ज्येष्ठ शुद्ध ९ शके १७१९ च्या नवरोजच्या सणा निमित्त यांस अलंकाराची सरफराजी ( देणगी ) झाली.

पुढें थोड्याच वर्षानंतर ह्मणजे शके १७२१ त हे स्वर्गस्थ झाले. यांच्या कुटुंबाचें नांव भागीरथीबाई असें होतें.

# प्रकरण १० वें.

## श्रीकृष्णराव आणि भवानीशंकरराव.

हे श्री. शामराज बहादुर यांच्या तृतीय पत्नी श्रीमती शामाबाई यांजपासून झालेले उभय पुत्र होत. हीं मुलें लहान असतांनाच मातोश्री निवर्तल्या. शामाबाई निवर्तल्यामुळें श्रीमंतांनीं पुन्हा विवाह केला. नूतन कुटुंब लहान असल्यामुळें चिरंजीवांची व्यवस्था नीट होईना. या वेळीं नबाब निजाम अलिखां यांचा अमल होता. मुलांच्या अव्यवस्थेची गोष्ट जेव्हां नबाब साहेबांच्या बेगम साहेब ज्या वक्षी बेगम साहेब या नांवानें प्रसिद्ध होत्या त्यांस कळतांच त्यांनीं या उभयतां मुलांस आपल्या महालांत निजाम साहेबांच्या आज्ञेनें ठेवून घेतलें. आणि त्या ठिकाणीं ब्राह्मण धर्मास अनुकूल अशा सर्व प्रकारच्या श्रीमंती थाटमाटासह त्यांची व्यवस्था ठेविली होती. हीं मुलें आपल्या पदरच्या उच्च प्रतीच्या नौकराचीं व श्रेष्ठ वर्णाचीं असल्यामुळें बेगम साहेबांनीं दुसऱ्या कोणावर न सोंपतां आपण स्वतः त्यांवर देखरेख ठेवूं लागल्या. तीं मुलें जसजशीं मोठमोठीं होऊं लागलीं, तसतशी त्यांच्या लिहिण्यावाचण्याचीही व्यवस्था ठेविली.

मुलांच्या उपनयनाचा काळ समीप येतांच हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें मुसलमानाच्या घरीं उपनयन संस्कार होणें अप्रशस्त आहे, असें जाणून त्यांस त्यांच्या वडिलांच्या स्वाधीन केलें. त्यांस राहण्याकरितां यांच्या घरीं दुसरा वाडा बांधवून आपल्या वाड्यांत असलेल्या सर्व सुखाच्या सोई सुद्धां तेथें रहावयास फर्माविलें, व मुंजीचे वेळीं

आपले पति नबाब निजाम अलिखां यांसह तेथें येऊन शामराज बहादुर ह्यांस हुकुम केला कीं, हीं मुलें आमचीं आहेत तेव्हां तुमच्या धर्मास व आमच्या योग्यतेस शोभेल असा मुंजीचा सर्व सोहळा झाला पाहिजे. असें सांगून मुंजीचा सर्व सोहळा आटपेपर्यंत हीं उभयतां (निजाम सरकार व बक्षी बेगम) मुलांच्या नवीन राजवाड्यांत राहिलीं. तीं परत जातांना शामराज बहादुरांनीं त्यांस साजेल अशा रीतीचा थोर अहेर (जोडा) दिला. नंतर सरकार स्वारी व बेगम साहेब आपल्या सर्व लवाजम्यानिशीं परत गेले. या मुत्सद्दी घराण्याच्या स्वाधीन जें सरकारी दप्तर होतें तें याच नवीन दिवाणखान्यांत ठेवविलें.

श्रीकृष्णराव ह्यांस दोन हजारांची मनसब व 'राजा' ही पदवी मिळाली होती. थोड्याच दिवसांनीं हे स्वर्गस्थ झाले.

भवानीशंकरराव ह्यांस मिति कार्तिक शुद्ध १ शके १७०९ त दोन हजारांची मनसब अलम् व 'अमानतराम' ह्या पदवीसह मिळाली.

मिति श्रावण शुद्ध १३ शके १७१० त ह्यांस प्रतापपूर प्रांत बेदरची देशमुखी मिळाली.

मिति आषाढ शुद्ध ९ शके १७१९ त तीन हजारांची मनसब व 'बाबूराज' ही पदवी आणि पंतअमात्याचीं वस्त्रें मिळालीं.

हे मार्गशीर्ष शुद्ध ९ शके १७२१ त श्री रामेश्वरच्या यात्रेस गेले होते. ( त्या वेळीं यांचे वडील त्याच ठिकाणीं होते ) तेथून परत आल्यानंतर मिति पौष शुद्ध १२ शके १७२८ त प्रकृति बिघडल्यामुळें हवापाणी बदलण्यास बेदर प्रांतीं आपल्या वडिलांजवळ गेले, व तेथेंच त्याच वर्षी मिति माघ वद्य १० चे दिवशीं स्वर्गस्थ झाले.

यांच्या पत्नीचें नांव सकूबाई असें होतें.



**चिमणा राजाराम**

राजा रायरायां बहादुर अमानतराम.

जन्म शके १७३२. मृत्यू १४-९-१७९९.

# प्रकरण ११ वें.

## निजाम नवाब सिकंदरजाह बहादुर असफजाह ३ रे व नवाब नासरद्दौला बहादुर असफजाह ४ थे यांची कारकीर्द.

### चिमणा राजाराम.

( श० १७३२ ते १७५९ ).

हे श्रीमंत राजा शामराज बहादुर यांचे कनिष्ठ पुत्र होत. यांचा जन्म शके १७३२ त झाला. मिति आषाढ वद्य ९ शके १७४४ त सर्व वडिलोपार्जित मान मरातब, जहागिरी, 'राजा राय रायां बहादुर अमानतराम' ही पदवी मिळाली.

मिति वैशाख शुद्ध १० शके १७४६ त यांचा विवाह येथील सरकारी कामाठीबेड्याचे शिरस्तेदार ( जे हल्लीं कामाठीवाले या नांवानें प्रसिद्ध आहेत ) यांची कन्या-अन्नपूर्णाबाई यांच्याशीं झाला.

पुढें नऊ वर्षांनंतर हे मिति मार्गशीर्ष शुद्ध १४ शके १७५९ बुधवारीं स्वर्गस्थ झाले.

नंतर त्यांच्या पत्नी अन्नपूर्णाबाई ह्या मिति वैशाख शुद्ध २ शके १७६० गुरुवारीं स्वर्गस्थ झाल्या.

# प्रकरण १२ वें.

## नवाब नासरदौला बहादुर असफजाह ४ थे यांची कारकीर्द.

### राजा जयरामराव.

( श० १७३३ ते १७६९ ).

ह्यांस चिमणा राजाराम यांच्या नंतर मिति पौष शुद्ध ६ शके १७५५ गुरुवारीं चार हजारांची मनसब, अलम्, नकारा, मोर्चेल, सरपेंच, कंठी, इत्यादि अलंकार, दिवाणी दप्तरची शिरस्तेदारी, सर देशपांडेगिरी वगैरे बहुमान मिळाला.

शके १७५६ जेष्ठ वद्य २ सोमवारीं पांच हजारांची मनसब व 'राजा राय रायां बहादुर' ही पदवी मिळाली. (ज्या वेळीं निजामसरकार हे राजा नानक बक्ष यांच्या विवाहास राजा चंदुलालचे बोलावण्यावरून त्यांच्या देवडींत गेले होते; त्या वेळीं हे राजे साहेब ही त्यांज समागमें होते. त्या ठिकाणीं ही पदवी मिळाली. )

मिति भाद्रपद शुद्ध १४ शके १७६९ गुरुवारीं यांस राजदरबारांत बसण्याचा मान मिळाला. ( दिवाण, पेषकार, यांच्या शिवाय ज्यांस सरकारी हुकूम झाला असेल त्यांनींच दरबारांत बसावें व बाकीच्यांनीं उभे रहावें अशी चाल आहे ).



**जयरामराव**

राजा रायरायाँ बहादुर.

जन्म श० १७३३.  मृत्यू २०-८-१७६९.

यांच्या अमलांतही या संस्थानचीं कामें पहाण्यास राय त्र्यंब-कपंत हेच कारभारी होते. हे त्र्यंबकपंत शके १७६० त निवर्तले. त्यानंतर त्यांचे पुतणे राय सोनाजीपंत हे या संस्थानची देखरेख करणारे कारभारी झाले.

या राजेसाहेबांचें लग्न बाबूराव धनासरी यांची कन्या लक्ष्मीबाई यांजबरोबर झालें होतें.

राजे साहेब हे मिति कार्तिक वद्य ९ शके १७६९ रविवारीं स्वर्गस्थ झाले.

यांच्या नंतर यांचें कुटुंब मिति कार्तिक शुद्ध १४ शके १७७१ त निवर्तलें.

# प्रकरण १३ वें.

## निजाम नवाब नासरद्दौला बहादुर असफजाह ४ थे व नवाब अफझलद्दौला बहादुर असफजहां ५ वे यांची कारकीर्द.

### राजा नरहरराव.

( शके १७५२ ते १७८१ ).

यांचा जन्म मिति वैशाख शुद्ध १४ शके १७५२ गुरुवारीं टांकळी मुकामीं झाला. राजा जयरामराव निवर्तले त्या वेळीं हे आपल्या जहागिरीचें गांव टांकळी येथें होते. तेथून हुजूर निजाम सरकारच्या बोलावण्यावरून त्याच वर्षी शके १७६९ मार्गशीर्ष शुद्ध १२ स येथें आले. त्याच वर्षी मिति माघ वद्य १ सोमवारीं यांस पांच हजारांची मनसब, अलम, नकारा, सरपेंच, कंठी, व ‘ राजा रायरायां बहादुर ’ ही पदवी मिळाली.

मिति पौष वद्य १० शके १७७७ शुक्रवारीं निजाम सरकारची स्वारी हवा खोरीस निघाली असतां यांचा मैलारदेव पल्ली येथें एक लहानसा टुमदार बाग शहरचे दक्षिणेस आहे, तो त्यांचे दृष्टीस पडला. सरकारांनीं तेथील शोभा पाहून विचारिलें कीं, ‘ ये बगीचा किनका है ’? ‘ सरकार ! राजे रायरायां बहादुर का है.’ हीं प्रश्नोत्तरें होतात न होतात तोंच राजेसाहेब बरोबरच होते ते



**नरहरराव**

राजा रायरायां बहादुर.

जन्म १४–२–१७५२.     मृत्यू १३–६–१७८१.

पुढें होऊन हात जोडून आंत येण्याविषयीं विनंती केली. निजाम सरकार फार खुष होऊन सर्व लवाजमा व अमीर उमरावांसह आंत गेले, व तेथील शोभा पाहून तेथेंच राहण्याचा बेत ठरला, व बरोबरीच्या हिंदु मुसलमान अमीर उमरावांसह कांहीं दिवस तेथेंच राहिले.

यांचें लग्न राजारामपंत वाळूजकर यांची कन्या रेणुकाबाई यांशीं झालें होतें. ह्या बाई साहेब मिति मार्गशीर्ष शुद्ध १२ शके १७८० शनिवारीं निवर्तल्या.

पुढें राजे साहेबांचा दुसरा विवाह केशवराव नागापूरकर यांची कन्या रेणुकाबाई यांजशीं झाला.

श्री० राजा नरहरराव हे मिति भाद्रपद शुद्ध १२ शके १७८१ शनिवारीं स्वर्गस्थ झाले. पुढें दुसऱ्या रेणुकाबाई साहेब मिति भाद्रपद वद्य ७ शके १७९२ त निवर्तल्या.

# प्रकरण १४ वें.

## नवाब अफझलद्दौला बहादुर असफजाह ५ वे व नवाब मीर महबुब अलिखां बहादुर असफजाह ६ वे यांची कारकीर्द.

### राजा शंकरराव.

( शके १७७२ ते १८०८ ).

याचा जन्म हैदराबाद येथें मिति वैशाख वद्य १४ शके १७७२ साधारण नाम संवत्सरे रविवारीं झाला.

**श्लोक.**

॥ शके नेत्राश्व मुनि भूप्रमिते माधवा-सिते ॥
॥ चतुर्दश्यां रवौ राजा शंकरः प्रादुरास वै ॥

मिति माघ शुद्ध ५ शके १७७८ शुक्रवारीं यांचा व्रतबंध झाला. नंतर यांस मुंजीची सरफराजी ( देणगी ) मिति फाल्गुन वद्य ११ रविवारीं झाली.

मिति मार्गशीर्ष शुद्ध ३ शके १७७९ गुरुवारीं ह्यांस यांच्या वडिलांच्या हयातींत 'राजा अमानतवंत बहादुर' ही पदवी व दोन हजारांची मनसब मिळाली.

वडील निवर्तल्यानंतर मिति श्रावण वद्य ७ शके १७८२ त दिवाणी दप्तरची शिरस्तेदारी, कंठी, सरपेंच 'रायरायां' ही पदवी,



**शंकरराव**

राजा रायरायां बहादुर अमानतवंत

जन्म २९–२–१७७२.        मृत्यू ९–८–१८०८.

दोन हजारांची मनसब, व सर्व प्रकारच्या जाहगिरी मिळाल्या. हे वयानें लहान असल्याकारणानें संस्थानचे देखरेखी करितां एक कमेटी नेमिली होती. तिचे मेंबर राय राजेश्वरराव ( रायजी ), राजा यशवंतराव अरब, बापुराव पीलखाने, व मार्तंडराव बाप्पाजी वकील, या प्रमाणें होते, व तिचे अध्यक्ष राजे साहेबांचे चुलते श्रीमंत खंडेराव तात्या साहेब हे होते. यांच्या सर्व कामावरची देखरेख नबाब सर सालारजंग मुख्य प्रधान हे स्वतः करीत असत.

यांचा विवाह कृष्णराव दादा साहेब तुळशीबागवाले पुणेकर यांच्या कन्या श्रीमती पार्वतीबाई यांजशीं मिति मार्गशीर्ष शुद्ध ८ शके १७८७ रविवारीं झाला. त्याच वर्षी मिति पौष वद्य ११ गुरुवारीं लग्नाची सरफराजी झाली. शके १७९४ श्रावण मासीं हे टांकळीहून श्रीक्षेत्र काशी, प्रयाग, गया या त्रिस्थळी यात्रेस गेले होते. तेथून त्याच वर्षी आश्विन शुद्ध १ स परत आले.

शके १७९५ च्या माघ मासीं श्रीशामराजेश्वरास गेले होते.

मिति आषाढ शुद्ध २ शके १७९६ त आषाढी यात्रेच्या निमित्तानें श्रीक्षेत्र पंढरपुरास गेले होते. त्याच वर्षी कार्तिक वद्य ४ स यांची स्वारी श्रीगाणगापुरास गेली होती.

मार्गशीर्ष शके १८०५ त श्रीराजराजेश्वर, यमलवाडा धर्मपुरीच्या यात्रेस गेले होते, तेथून परत येते वेळीं वाटेंतच सांप्रतच्या निजाम सरकारच्या राज्यारोहणच्या समारंभाचें वर्तमान कळल्यावरून तात्काळ माघ वद्य ८ स येथें आले.

यांचा द्वितीय विवाह मिति वैशाख शुद्ध ६ शके १८०६ त

सिकंदराबादचे रामराव निमकल्लपा यांची कन्या श्रीमती अंबाबाई साहेब यांशीं झाला.

त्याच वर्षीं कार्तिक वद्य १३ स यांचें प्रथम कुटुंब निवर्तलें.

मिति माघ वद्य १२ शके १८०६ त हे श्रीक्षेत्र उज्जनी येथें महा शिवरात्री निमित्त श्रीमहाकाळेश्वराचे दर्शनास गेले होते. ( प्रति शिवरात्रीस एक ज्योतिर्लिंगाचें दर्शन घ्यावें असा यांचा मानस होता ) यांनीं प्रत्येक शिवरात्रीस एक अशीं आठ ज्योतिर्लिंगाचीं ह्मणजे श्रीकाशीविश्वेश्वर, श्रीउज्जनीमहाकाळेश्वर, श्रीत्र्यंबकराज, श्री वेरुळघृष्णेश्वर, श्रीआंवंढेनागनाथ, श्रीपरळीवैजनाथ, श्रीभीमाशंकर, श्रीरामेश्वर, दर्शनें घेतलीं.

शके १८०७ चे कार्तिक मासीं यांची स्वारी श्रीकुमारस्वामी ( कार्तिक स्वामी ) यांच्या दर्शनास गेली होती. त्या वेळीं त्यांची व्यवस्था त्याच प्रांतांतील सोंडूर नांवच्या संस्थानच्या राजेसाहेबांनीं फार चांगल्या प्रकारें ठेवून राजेसाहेबांस संतुष्ट केलें. परत येतांना श्रीक्षेत्र हंपी विद्याशंकरभारतीचें संस्थानपीठ पाहून व तेथील सर्व देवस्थानांचें दर्शन घेऊन मद्रासेहून परत आले.

पुढें माघ ७ स श्रीरामेश्वरची यात्रा करून श्रीशिवकांची, विष्णुकांची, श्रीवेंकटेश, श्रीपक्षितीर्थ, इत्यादि दक्षिण यात्रा करून पुन्हा श्रीकाशीयात्रा पूर्ण करण्यास श्रीकाशी, प्रयाग इत्यादि थोर थोर क्षेत्रें तीर्थें अवलोकन करून अक्कलकोटाहून ( या ठिकाणीं यानीं श्रीस्वामीच्या पादुका स्थापन केल्या. याच्या सर्व पूजेचा व उत्सवाचा खर्च संस्थानांतून होत असतो. ) परत हैद्राबादेस आले.

हे मिति कार्तिक शुद्ध ५ शके १८०८ व्ययनाम संवत्सरें

सोमवारीं सूर्योदयाचे अगोदर इहलोक सोडून स्वर्गसुखाचा अनुपम लाभ घेण्यास मार्गस्थ झाले.

### श्लोक

॥ शके वसुव्योमवसुभूमिते सोमवासरे ॥
॥ कार्तिके शुद्धपंचम्यां शंकरो दिवमारुहत् ॥१॥

यांचें द्वितीय कुटुंब अंबाबाई साहेब ह्या मिति कार्तिक वद्य १४ शके १८१३ सोमवारीं स्वर्गस्थ झाल्या.

# प्रकरण १५ वें.

## निजाम नवाब मीर महबूबअलिखां बहादुर असफजाह महावे यांची कारकीर्द.

### राजा लक्ष्मणराव बापू साहेब, राय रायां बहादुर.

**अमानतवंत.**

( शके १७९९ )

यां चा जन्म मिति माघ वद्य ३ शके १७९९ श्रीमुख नाम संवत्सरे बुधवारीं सूर्योदयाचे समयीं मुकाम चिमकोड तालुके कारेमुंगी प्रांत बेदर या ठिकाणीं आपल्या आजोळीं झाला.

**श्लोक**

॥ शके बाणांक मुनिभूसंमिते सौम्यवासरे॥
॥ माघ कृष्ण तृतीयायां श्रीलक्ष्मण नृपोऽजनिः ॥

मिति वैशाख शुद्ध १० शके १८०४ गुरुवारीं यांचा उपनयन संस्कार झाला.

पुढें त्याच वर्षी मुंजोची सरफराजी ( देणगी ) झाली.



चित्रशाळा प्रेस, पुणें.

श्री० राजे लक्ष्मणराव महाराज, राजे रायरायां वहादूर, अमानतवंत.

शके १८०८ त जेव्हां श्री० शंकरराजा कैलासवासी झाले, तेव्हां मिति कार्तिक वद्य १० स निजाम सरकाराकडून नबाब मुष्त-हकम्‌जंग बहादुर, मुख्य प्रधानाकडून, बडी बडी मंडळी दुःखाचे शांतवनार्थ आली होती.

पुढें त्याच वर्षीं मिति मार्गशीर्ष शुद्ध ८ स यांचें अल्पवय अस-ल्या कारणानें संस्थानची देखरेख करण्याकरितां मुख्य प्रधान नबाब मीर लायक अलिखां बहादुर इमादुःसल्तनत यांज कडून राजा श्रीनि-वासराव ( कारवान श्रीनिवासराव ) यांस नेमिलें होतें. पुढें पंधरा दिवस ह्मणजे फाल्गुन शुद्ध ७ पासून वद्य ८ पर्यंत माजि पंतअमात्य ( पेषकार ) महाराजा नरेंद्र बहादुर यांस नेमिलें होतें.

नंतर फाल्गुन वद्य ८ स एक कमेटी नेमिली होती. तिचे अ-ध्यक्ष हुजूर निजामसरकारचे सेक्रेटरी कर्नल मार्शलसाहेब हे असून मेंबर मि. ए. जे. डनलॉफ ( सध्यांचे रेविन्यू सेक्रेटरी ) व हुजूर निजाम सरकारचे ए. डी. सी. नबाब महबूबयार जंगबहादुर, व त्या कमेटीचे सेक्रेटरी लाला जसवंतीराम हे होते.

शके १८०९ वैशाख वद्य १२ मि. पेस्तमजी जिवनजी ( हल्लीं पेन्शनर ) हे पौष शुद्ध ६ पर्यंत व्यवस्थापक झाले.

श्री० राजा लक्ष्मणराव हे मिति वैशाख शुद्ध ३ शके १८०९ त मदरसे अलिया ( नोबल स्कूल ) मध्यें अभ्यास करण्यास निजाम सरकारचे आज्ञेवरून दाखल झाले. इतक्यांत श्री० खंडेराव तात्या-साहेब हे मिति वैशाख शुद्ध ६ शुक्रवारीं ( ह्मणजे राजा लक्ष्मणराव नोबल स्कूलमध्यें दाखल झाल्यावर दोन चार दिवसांनंतर ) परलोकवासी झाले. यांची प्रकृति बरेंच दिवसांपासून अजारी होती.

श्री० खंडेराव तात्यासाहेब हे राजा शंकरराव यांचे सखे चुलते होते. तात्यासाहेब शरीरानें सुदृढ, निरोगी असत. चेहरा दिसण्यांत उग्र दिसे, परंतु अंतःकरण फार कोमळ असे. राजा जयरामराव नंतर जेव्हां ह्यांस संस्थानच्या गादीवर बसविण्याचा नेम होऊन ह्यांस बोलाविलें, तेव्हां ह्यांनीं सांगितलें कीं, माझा कनिष्ठ बंधू नरहरराव ह्यास संस्थानचे गादीवर बसवावें. पहा ! स्वभावाचा साधेपणा, निष्कपट प्रेम, निर्मळ बंधुप्रेम या ठिकाणीं कसें उदात्त मनोवृत्तीचें दृष्टीस पडत आहे !!

तात्या साहेब स्वकीयांविषयीं जसे प्रेमळ असत तसेच ते नौकर चाकर, भिक्षूक, ब्राह्मण, शागीर्द, आचारी, पाणके सर्वांविषयीं असत. भोजनाचे वेळीं शें दिडशें मंडळींत नित्यापैकीं कोणी दिसला नाहीं तर त्याचा शोध करून कां येत नाहीं वगैरेचें कारण पुरतें समजल्यावांचून कधीं राहूं नये. तसेंच संस्थानचे जे परंपरागत चालत आलेले कुलाचार ते सर्व यथास्थितहोण्या विषयींचीही फार दक्षता असे.

मिति आषाढ शुद्ध ४ शके १८१० त संस्थानचे व्यवस्थापक मौलवी महमूदअलि ( हल्लीं पेन्शनर ) झाले होते.

त्याच वर्षीं मात्र वद्य ७ स निजाम कॉलेजचे माजि प्रिन्सिपाल मि. एच. पी. हडसन यांच्या देखरेखी खालीं ‘ बोर्डिंग हौस ’ मध्यें निजाम सरकारच्या आज्ञेवरून दाखल झाले. हे आपल्या सर्व क्रमांत नियमितपणानें वागून बालक्रीडेचे खेळ सर्वांबरोबर खेळून, अभ्यासपरीक्षणसमयीं व क्रीडा परीक्षण समयीं बहुत वेळीं निजाम सरकाराकडून स्वतः सरकारच्या हस्तें त्या त्या क्रमास योग्य अशीं पारितोषिकेंही ( बक्षिसें ) यांनीं मिळविलीं आहेत.



चित्रशाळा प्रेस पुणें.

लेट एच. पी. हडसन प्रिन्सिपाल निझाम कॉलेज आणि ट्युटर खास राजे लक्ष्मणराव महाराजा बहादूर राजा रायराया.

**या स्थळीं मि. हडसन यांचें थोडेंसें वर्णन केलें असतां अप्रासंगिक होणार नाहीं.**

लेट ह्यू पिक्टन हडसन हे इ. स. १८५७ च्या बंडांत नांवाजलेले मेजर हडसन यांच्या घराण्यापैकीं होते. हें घराणें इंग्लंडमध्यें मोठें प्रसिद्ध गणलें जात आहे. यांनीं आपला अभ्यास त्याच देशांत करून शेवटीं केंब्रीज युनिव्हर्सिटीचे एम. ए. होऊन डिग्री मिळविली. हे प्रथमतः नोबलस्कूलचे हेड मास्तर या नात्यानें निजामसरकारच्या आज्ञेवरून मिति वैशाख शुद्ध ३ शके १८०३ त आले. पुढें या ठिकाणीं जेव्हां निजाम कॉलेज स्थापन झालें, तेव्हां त्याचे प्रिन्सिपाल सरकाराकडून यांसच नेमिलें. यांचें लग्न येथील माजि मिलिटरी सेक्रेटरी मेजर पार्सिगॉफ ( हे लॉर्ड गॉफ ऑफ चिलिनवाला यांच्या घराण्यापैकीं होते ) यांची कन्या यांशीं झालें होतें. हे कांहीं दिवसपर्यंत सांप्रतच्या निजाम सरकारचे शिक्षक होते.

हे मिति माघ वद्य ७ शके १८१० त राजा लक्ष्मणराव बापू साहेब यांचे शिक्षक झाले. प्रिन्सिपालशिप शिवाय राजेसाहेबांचे शिक्षणाकरितां इस्टेटींतून दोनशें रुपये दरमहा पगार ह्यांस दिला जात असे.

हे स्वभावानें फारच मनमिळाऊ होते. यांचा शिष्यवर्गाशीं वर्तनक्रम असा असे कीं, मुलांस जरी रात्रंदिवस बोर्डिंगांत यांच्या देखरेखीखालीं रहावें लागे तरी मुलांस असें वाटावें कीं, यांचा सहवास जितका अधिक होईल तितका हितकरच आहे; कारण खेळतां, निजतां, बसतां, उठतां, जेवतां, खातां, फिरतां, विद्या, नीति, विनय, सत्यता, इत्यादि जे जे गुण मनुष्यांमध्यें अवश्य असले पाहिजेत,

व विशेषतः राजपुत्रांमध्यें असावे ते, आपोआप मिळत असत. शिवाय बाळपणांत मुलांस विशेषेंकरून खेळणें प्रिय असतें, तेंही असें हितकर ठेवीत असत कीं, त्यापासून शरीर दृढ होऊन शौर्य धैर्य, काटकपणा इत्यादि गुण वाढून सुख व्हावें. राजेसाहेबांसही शारीरिक खेळाची हौस असे. यांस घोड्यावर बसण्याची फारच आवड असे, व त्या कामांत हे इतके प्रवीण झाले कीं, कॉलेजच्या एकंदर मुलांमध्यें घोड्यावर बसून पाहिजे तीं कामें करणें, सर्व प्रकारच्या शर्यती जिंकणें, निशाण मारणें, खुंट्या उपटणें, ( या हातभर लांबीच्या मेखा भूमीमध्यें रोवून नंतर भरधांव घोडा फेंकून हातांतील भाल्यानें किंवा तलवारीनें न चुकतां तितक्या त्वरेनें धांवण्यांत या मेखा उपटाव्या ), घोड्यावरून तट्टी उडणें-वगैरे सर्व खेळांत यांची बरोबरी करणारा त्या वेळीं कॉलेजमध्यें विरळाच होता; व या कामांत परीक्षेच्या वेळीं यांस पुष्कळ बक्षिसें मिळालीं आहेत. प्रिन्सिपाल साहेब नेहमीं राजेसाहेबांसह सकाळ संध्याकाळ घोड्यावर बसून हवा खोरीस जात असत.

श्रीमंतांची मेहनत, हुशारी, नीति, विनय इत्यादि गुण पाहून प्रिन्सिपाल साहेबांनीं आपल्या दोन वर्षांच्या वार्षिक रिपोर्टांत पुढें लिहिल्याप्रमाणें आपला अभिप्राय दिला आहेः—

"मिडलच्या परीक्षेंत पास झालेल्या विद्यार्थ्यांपैकीं राजा लक्ष्मण राव हे एक होत. हे गेल्या वर्षींच पास झाले असते, परंतु यांची मातोश्री ( अंबाबाई साहेब ) त्याच वर्षीं स्वर्गस्थ झाल्यामुळें हे परीक्षेस जाऊं शकले नाहींत, तरी त्यानीं पुढील क्लासांत ह्मणजे प्रीम्याट्रिक क्लासांत दाखल होऊन दोन्ही क्लासांचा अभ्यास चाल-विला. शेवटीं ह्या वर्षीं मिडलची परिक्षा पास होऊन निजाम सर-

कारच्या राज्यांत गणित विषयांत दुसरा नंबर मिळविला. यावरून मी सरकारपासून अशी आशा करितों कीं, ते याचें चांगलें चीज करितील."

दुसरा वार्षिक रिपोर्टः—

" राजा लक्ष्मणराव हे माझ्या शिक्षेंत आल्यापासून चांगल्या रीतीनें अभ्यास करीत होते. मिडल पास झाल्यावर म्याट्रिक वर्गांत दाखल झाले, व तो अभ्यासही चांगला चालू झाला. यांची पास होण्याची आशाही होती. इतक्यांत निजामसरकारांतून यांचें संस्थान यांच्या स्वाधीन केलें. पुढें अर्थात् आपल्या संस्थानचें कामकाज व सर्व प्रकारची देखरेख करण्यांत वेळ पुरेना, तेव्हां तें करून शाळेचा अभ्यासक्रम चालविण्यास अडचण पडूं लागली, म्हणून निरुपायास्तव पुढील अभ्यासक्रम सोडणें भाग पडलें. तथापि शिकण्याची उत्कट इच्छा असल्यामुळें त्यांतल्या त्यांत वेळ काढून फावल्या वेळीं मजपाशीं येऊन इंग्लिश, गणित, पोलिटिकलएकानमि, इत्यादिंचा अभ्यास करीत असत. हे फार हुशार, उद्योगी, मर्यादशील आहेत. सरकारांनीं त्यांस कोणतेंहि काम दिलें तरी तें हे दक्षतेनें करतील अशी माझी खातरी आहे. "

प्रिन्सिपाल हडसन साहेब यांचें अंतःकरण महाराजांवर इतकें प्रेमळ असे कीं, ते जशी यांच्या शिक्षणाची काळजी घेत असत, तशीच यांच्या प्रकृतीविषयींही काळजी वहात असत. त्यांनीं सरकारांत शिफारस करून ले. क. स. लॉरी यांनीं एक दोन दिवसां आड कॉलेजमध्यें जाऊन राजे साहेबांची प्रकृति पहावी, अशी योजना केली होती.

राजे साहेबांनीं शाळा सोडल्यावर त्यांस प्रिन्सिपाल साहेबांचें

एक पत्र आलें आहे. त्यांतील मजकूर वाचला ह्मणजे त्यांच्या साध्या स्वभावाचें स्वरूप प्रत्यक्ष दिसतें. त्यांनीं त्या पत्रांत एके ठिकाणीं असें ह्मटलें आहें कीं, " राजे साहेब ! मीं आतां आपणास जें पत्र लिहीत आहें; त्यांत मी आपले गुरु हें नातें न ठेवितां 'मित्र' हें नातें ठेवितों. " पहा ! ! !

कोणताहि शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांवर नेहमी गुरुत्व स्थापूं इच्छितो; पण हे गुरु किती साधे व शिष्यास मित्रत्वानें वागवून त्याचें मन आपल्या मनाशीं मिळविणारे होते. असो.

मि. हडसन हे मिति फाल्गुन वद्य १२ शके १८१६ शनिवारीं निवर्तले.

मिति वैशाख वद्य ३० शके १८१२ त राजे साहेब मि. हडसन साहेबांबरोबर मुंबई, पुणें, इत्यादि ठिकाणीं गेले होते.

त्याच वर्षीं मिति आषाढ वद्य १३ स यांच्या संस्थानचे व्यवस्थापक मौलवी पुजातअलि हे झाले.

शके १८१३ च्या मार्गशीर्ष मासीं हुजूर निजाम सरकारच्या वाढदिवसानिमित्तच्या स्पोर्टमध्यें घोडदौडची शर्यत यांनीं आपला प्रिय घोडा 'एक्लिप्स' याजवर बसून जिंकिली, व रेसिडेंट साहेबाच्या हस्तें एक चांदीचा प्याला बक्षिस मिळविला.

मिति माघ शुद्ध १४ शके १८१४ त मिडल स्कूलच्या परीक्षेचा रीझल्ट बाहेर पडला. त्यांत यांचा गणित विषयांत निजाम सरकारच्या राज्यांत दुसरा नंबर आला. त्यानंतर हे म्याट्रिक क्लासांत दाखल झाले. त्याच वेळीं यांचा विवाहाचा निश्चय झाला. वधू उमरावतीकर तहशीलदार रा. रा. गिरिराव

अण्णा यांच्या कन्या नेमिल्या. यांना मिति वैशाख शुद्ध ६ शके १८१४ त निजाम सरकारांनीं स्वहस्तें यांस यांच्या लग्नाचा 'सहेरा' ( हा सहेरा लग्नांत निजामसरकारांनीं येथील अमीर उमरावांस बांधावयाचा असतो. हा फुलांचा असून मुंडावळी सारखा असतो. ) बांधिला.

शुद्ध ९ पासून लग्नपत्रिका वांटण्यास आरंभ झाला. पत्रिकेंत आंरभीं 'चिरंजीव लक्ष्मणराव खलफ ( पुत्र ) राजा राय रायां बहादुर' —असे शब्द असून शेवटीं निजामसरकार तर्फे 'विकारुल् उमरा' अशी सही होती. ( विकारुल उमरा हे हल्लींच्या निजामसरकारचे मेहुणे व खास पायगेचे अमीर होते. यांस सुमारें पंधरा सोळा लक्षांची जहागिर असून, हे त्या वेळीं रेविन्यू खात्याचे मिनिस्टर होते, व पुढें सर अस्मानजहांच्या मागून मुख्य प्रधान झाले होते. )

शुद्ध १० शुक्रवारीं निश्चयाप्रमाणें मोठ्या थाटानें विवाह झाला.

पुढें हे शके १८१५ च्या मार्गशीर्ष मासीं वद्य १३ स निजामसरकारच्या आज्ञेवरून बोर्डिंगांतून निघून आपल्या राजवाड्यांत आले, व आपल्या संस्थानच्या देखरेखीचें सर्व खानगी, दप्तरी, जहागिरी प्रकर्णी इत्यादि कामें पाहूं लागले.

मिति चैत्र शुद्ध २ शके १८१७ गुरुवारीं निजामसरकाराकडून ह्यांस लग्नाची सरफराजी झाली.

पुढें त्याच वर्षीं मिति भाद्रपद शुद्ध १० गुरुवारीं ह्यांस प्रथम कन्या रत्न झालें. त्यांचें नांव 'ललिताबाई' असें आहे या बाईचा नामकरणसंस्कार बराच थाटाचा झाला.

शके १८१८ श्रावण शुद्ध १० स निजामसरकारांनीं आपल्या संस्थानसंबंधीं सर्व कामकाज चालविण्याची हुशारी पाहून ह्यांस वडिलार्जित चालत आलेली यांच्या संस्थानची पूर्ण मुकत्यारी सर्व मानमरातब व जहागिरीसहित दिली.

त्याच वर्षीं मिति फाल्गुन वद्य १३ मंगळवारीं द्वितीय कन्यारत्न झालें. त्याचें नांव 'ललिता अंबाबाई' असें आहे.

मिति ज्येष्ठ शुद्ध ३ शके १८१९ गुरुवारीं निजामसरकारच्या आज्ञेवरून महाराणी विक्टोरिया यांच्या डायमंड जुबिलीच्या वेळीं गरीब लोकांस अन्नवस्त्र देण्यासाठीं ज्या चार कमेट्या नेमिल्या होत्या, त्यापैकीं हिंदु लोकांच्या कमेटीचे मुख्य ह्यांस नेमिलें होतें.

त्याच वर्षी ज्येष्ठ वद्य ३० च्या फर्मान वरून सरकारी कर्जा-बद्दल जी कमेटी झाली होती, तिचेही हे एक मेंबर होते. त्यांत यांनीं सरकार तर्फे सर्व प्रश्नोत्तरें केलीं.

मिति फाल्गुन वद्य ७ शके १८१९ त हे पूर्वधाम श्री-जगन्नाथपुरीचे यात्रेस गेले होते. जातांना प्रथमतः खैरताबादेस जाऊन तेथून संध्याकाळचे मेलनें रवाना झाले. विजवाड्यास उतरून कन्यागत असल्यामुळें दर्शनें तीर्थ विधि इत्यादि करून राज-महेंद्रीस गेले. पुढें सिंव्हाचल नांवाच्या पर्वतावर गेले. या पर्वता-वरील हवा फार थंड आहे. येथें एक चमत्कार हा आहे कीं, उष्ण देशांत व थंड देशांत उत्पन्न होणारे सर्व प्रकारचे मेवे या ठिकाणीं फारच चांगले होतात.

पुढें श्रीजगन्नाथास जाऊन तेथें रीतीप्रमाणें देवदर्शन घेऊन गांवां-



**रेणुकादास**

राजा शामराज बहादुर.

जन्म २८-९-१८२०.

तील ब्राह्मणांस भोजनें व दक्षिणा देऊन यात्रा संपूर्ण केली. या ठि-
काणीं सर्व तीर्थें देवळें पाहून सहासात दिवस राहून तेथें श्री जगन्ना-
थास अक्षयचा नैवेद्य करून दिला, पुन्हा त्याच मार्गानें बिजवाड्यास
परत आले. तेथें आल्यावर मिति चैत्र शुद्ध १३ स स्मार्ताग्नि सिद्ध
केला. त्या दिवसापासून ब्राह्मणधर्माचें मुख्य औपासन निरंतर चालत
आहे. याप्रमाणें इच्छानुसार तीर्थ यात्रा करीत सुमारें एक महि-
न्यानें स्वारी हैदराबादेस येऊन दाखल झाली.

मिति श्रावण वद्य १३ शके १८२० विलंबी नाम संवत्सरे सो-
मवारीं सकाळीं आठचे सुमारास तिसरें मूल व प्रथम पुत्ररत्न झालें.
यांचें नांव ' रेणुकादास ' असें असून हे युवराज ' शामराज ' या
नांवानें प्रसिद्ध आहेत.

## श्लोक.

॥ शके व्योमाक्षि वसुभूमिते श्रावणिकेऽसिते ॥
॥ त्रयोदश्यां चंद्रवारे सामराजोऽजनि प्रभुः ॥ १ ॥

या युवराजांचा नामकरणविधि ज्या समारंभानें झाला तो बराच
वर्णनीय असल्यामुळें त्याचें थोडेंसें येथें वर्णन करितों.

प्रथमतः ज्या दिवशीं युवराजांचा जन्म झाला, त्या दिवशीं जन्मा-
च्या वेळीं राजवाड्यांतून ही आनंदाची सुवार्ता इतक्या त्वरेनें बाहेर
प्रसिद्ध झाली कीं, हां हां ह्मणतां सुमारें एक दोन घटकांतच सोयरे,
धायरे, ब्राह्मण, व इतर ज्ञाती, भिक्षुक, शास्त्री, पुराणिक, ज्योति-
षी, याचक वर्ग, फकीर, गोसावी, बैरागी वगैरे अनेक जातीचे लोक
मोठ्या तांतडीनें कांहीं मिळेल या आशेनें राजवाड्यांत धांवत सुटले.

पुत्रावण, मुखावलोकन इत्यादि शास्त्रोक्त विधीनें संस्कार झाल्यावर सर्व याचकवर्गाची यथायोग्य संभावना केली, व लोकही मोठ्या आनंदानें अंतःकरणपूर्वक कल्याण चिंतित आपल्या घरीं गेले.

आश्विन वद्य २ स नामकरणविधिही अशाच समारंभानें झाला. या वेळीं प्रथम शहरांतील निरनिराळ्या जातींतील थोर थोर लोकांस म्हणजे अमीर उमरावांस, सरकारी बड्या अधिकारी मंडळीस त्यांच्या योग्यतेप्रमाणें, व त्या त्या चाली प्रमाणें, मिठाई, खडीसाखर, बदाम, इत्यादि पदार्थांच्या किस्त्या शेकडों पाठविल्या गेल्या. याप्रमाणें इतर लोकांची यथायोग्य संभावना झाल्यावर स्वज्ञातीचे भोजनादि समारंभास सुरवात झाली.

प्रथमतः कनिष्ट प्रतीचे लोकांकरितां एक थोरलें जंगी प्रयोजन निश्चित करून त्याची योजना सर्व त्या प्रतीच्या लोकांस कळण्यापूर्ती अवधि ठेवून केली. या प्रयोजनाकरितां एक मोठें पटांगण राजवाड्यांतच तयार केलें, व त्या ठिकाणीं भोजनाची तयारी केली. त्या दिवशीं भोजनास सुमारें तीन हजार लोकांचा समुदाय जमला होता. ( या मंडळींत केवळ आगंतुक वर्गांत मोडणारे लोकच होते. ) भोजनाचा थाट मेजवानीसारखा होता. भोजन पात्रीं सरी सर्वत्र एक रुपया दक्षिणा दिली. या प्रयोजनाची दुपारीं सुमारें अकरा वाजल्यापासून मध्य रात्रीपर्यंत गडबड चालूच होती.

नंतर मध्यम प्रतीच्या लोकांच्यां मेजवान्या सुरू झाल्या. त्याची पद्धति अशी ठेविली होती कीं, या प्रतीच्या सर्व लोकांच्या घरोघर आमंत्रणें देऊन मोठ्या अगत्यानें येण्यास विनंति केली होती. लोकहि ब्राह्मण प्रभूच्या घरचें आनंदी कार्य जाणून मोठ्या उत्सुकतेनें नेमिल्या वेळीं येऊन दाखल झाले. या प्रयोजनाचा थाट



चित्रशाळा प्रेस पुणें.

श्री० राजे आमराज यांच्या प्रथम वाढदिवसाची समारंभपूर्वक स्वारी.

वर्णन करण्यापेक्षां इतकेंच सांगणें पुरे आहे कीं, भोजन करणाऱ्या सर्व मंडळीच्या तोंडून असे उद्गार ऐकूं येत होते कीं, आह्मी आजपर्यंत अशी जाफत ( मेजवानी ) कधींही पाहिली नाहीं. या मंडळींत ऐशीं वर्षांचे वृद्ध लोकही होते; त्यावरून असें ह्मणण्यास हरकत नाहीं, कीं, शेंपन्नास वर्षांत असा भोजनसमारंभ खचित् झाला नाहीं. असो.

मिति अधिक आश्विन वद्य ९ शके १८२० मंगळवारीं हुजूर निजाम सरकारच्या वाढदिवसानिमित्तच्या दरबारांत राजे साहेबांस 'राजा राय रायां अमानतवंत बहादुर' ही पदवी, साडे तीन हजारांची मनसब, व अलम्, नकारा यांसह मिळाली.

राजे साहेब मिति ज्येष्ठ शुद्ध १३ शके १८२१ त टांकळी इत्यादि आपल्या जहागिरींत फिरण्यास गेले होते.

त्याच वर्षीं मिति कार्तिक वद्य १२ स निजाम सरकारच्या वाढदिवसानिमित्त ब्राह्मण लोकांकडून निजाम सरकारास मानपत्र द्यावयाचें होतें, तें ब्राह्मण प्रभु हेच असल्या कारणानें सर्व ब्राह्मण वर्गानुमतें यांचेच हस्तें दिलें गेलें.

या पूर्वीं मिति भाद्रपद शुद्ध २ स श्रीमंत युवराजांच्या वाढदिवसाचा समारंभ करण्याचें ठरलें, तेव्हां जवळच्या मंडळीनीं महाराजांस विनंती केली कीं, हा समारंभ आमच्या इच्छेप्रमाणें करण्याची आह्मास मोकळीक दिल्यास आह्मावर आपली कृपा होईल. त्याप्रमाणें आज्ञा झाल्यावर सर्व मंडळीनीं आपापल्या मुलांकडून तो समारंभ करण्याचें ठरविलें व आपसांत वर्गणी जमवून उत्सवाची जागा मैलार देवपल्लीचा बाग योजिला.

याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर युवराजांस आमंत्रण दिलें. भोजनाचा बेतहि फारच उत्तम ठेविला होता. युवराजांची स्वारी ज्या गाडींत बसून आली ती गाडी बागेच्या द्वारापाशीं आल्याबरोबर सर्व मुलांनीं टाळ्यांचा गजर केला, व गाडी तेथेंच थांबवून गाडीचे घोडे सोडवून मुलांनीं ती आपणच ओढून बागेंतील राजमंदिरापर्यंत नेली. नंतर भोजन समारंभ आटपल्यावर बैठकीचे जागीं युवराज येतांच सर्वांनीं त्यांस सन्मानार्थ उत्थापन दिलें, व त्यांचेसाठीं तयार केलेल्या जागीं बसण्याची विनंती केली. युवराजांची स्वारी स्थानापन्न झाल्यावर योग्यतेप्रमाणें लिहून आणिलेलीं मानपत्रें अर्पण करण्यास आरंभ केला. या समारंभांत नाच होण्याकरितां ज्या वारांगना बोलाविल्या गेल्या होत्या, त्याही अल्पवयीच होत्या. हा बालराजाप्रीत्यर्थ बालसमूहानें केलेला बालसमारंभ पाहून तेथील आबालवृद्धांस परमाल्हाद झाला.

मिति फाल्गुन शुद्ध ११ शके १८२१ विकारी नाम संवत्सरे रविवारीं ह्यांस द्वितीय पुत्ररत्न झालें. त्यांचें नांव ' त्र्यंबकराज ' असें आहे.

## श्लोक.

॥ शके भूम्यक्षिवसुभूमिते तरणि वासरे ॥

॥ तपस्य शुद्धैकादश्यामजनि त्र्यंबको नृपः ॥ १ ॥

मिति ज्येष्ठ शुद्ध १० शके १८२२ त दशाहराचे पर्वणीनिमित्त श्रीक्षेत्र बासर येथें श्रीगोदावरी स्नानास गेले होते.

यांनीं आपल्या बागेंत मिति आश्विन वद्य ६ रविवारीं उत्तर रात्रीं सुमुहूर्तावर एक शिवलिंग स्थापन करून त्याचें नांव ' श्री



राजा त्र्यंबकराज बहादुर.

जन्म ११-१२-१८२१.



राजा धोंडिराज बहादुर.
जन्म ८-१२-१८२३.

लक्ष्मणेश्वर ' असें ठेविलें. या ठिकाणीं प्रति वर्षीं देवस्थापनेच्या दिवशीं व महाशिवरात्रीच्या दिवशीं उत्सव होत असतो. या शिवलिंगाचें स्तवन अश्वधाटी वृत्तांत वर्णानुक्रमानें येथील प्रसिद्ध गवई व शास्त्री. वे. शा. सं. रा. रा. काशीनाथ शास्त्री उर्फ आप्पा तुळशी यांनीं रचिलें आहे.

## श्लोक.

॥ नेत्रचक्षुर्गजेंदुश्च शार्वर्याब्दे सिताश्विने ॥
॥ व्युष्टे रौद्रे रवौषष्टयां सिंहे शंभुः प्रतिष्ठितः ॥ १ ॥

मिति चैत्र वद्य १० शके १८२३ रोजीं पोटशुळाचे व्यथेनें प्रकृति फार बिघडल्यामुळें महाबळेश्वर येथें हवा खोरीसाठीं गेले. त्या ठिकाणीं मुंबईचे माजि गवरनर लॉर्ड नार्थकोट, कोल्हापूरचे श्रीमंत शिवाजीमहाराज छत्रपति, मिरजचे श्रीमंत गंगाधरराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन, वाईचे श्रीमंत बाळासाहेब रास्ते, श्री. बाबा-साहेब बिवलकर (अलिबागचे आंग्रे), श्री. सरदार बाळासाहेब नातु इत्यादि बड्या बड्या मंडळीच्या भेटी झाल्या. परत येतेवेळीं मुंबई, पुणें, इत्यादि शहरें व वांई, सज्जनगड, गाणगापूर, नरसो-बाची वाडी, कोल्हापूर इत्यादि क्षेत्रें तिर्थें पहात पहात दोन महिन्यांनीं परत आले.

पुढें त्याच वर्षी मिति फाल्गुन शुद्ध ८ प्लवनाम संवत्सरे रविवारीं तिसरें पुत्ररत्न झालें. त्यांचें नांव धुंडिराज असें आहे.

## श्लोक.

॥ शके गुणाक्षिवसुभूमिते द्युमणिवासरे ॥
॥ फाल्गुनस्य सिताष्टम्यां धुंडिराजोजनि प्रभुः ॥ १ ॥

मिति फाल्गुन वद्य ११ स हे श्रीक्षेत्र रामेश्वरच्या यात्रेस गेले होते. जातांना श्री मधुरा ( मीनाक्षी ) चें दर्शन घेऊन पुढें गेले. तिकडील यात्रा आटपून सीलोन ( लंका ) बेटांत गेले होते. या ठिकाणचें वर्णन महाराजांनीं आपल्या रोजनिशींत ( डायरी ) फार सुरस व मनोहर केलें आहे. ती डायरी पाहून मला असें वाटलें कीं, हें इत्थंभूत वर्णन जसेंच्या तसेंच आपण ही येथें ल्याहावें; परंतु तो भाग भूगोलवर्णनाचा असल्यामुळें सोडणेंच भाग आहे.

मार्गशीर्ष शुद्ध २ शके १८२४ त हे सातवे एडवर्ड बादशहा यांच्या राज्यारोहणानिमित्त निजामसरकारा समागमें दिल्ली दरबारास गेले होते. परत येतांना आग्रा, मथुरा, गोकुळ, वृंदावन, इंदोर, अजमीर, जावरा, इत्यादि शहरें व देवस्थानें तीर्थें पहात पहात बरोबरच्या लवाजम्यानिशीं सुमारें दोन महिन्यांनीं परत आले.

फाल्गुन वद्य १३ गुरुवारीं ह्यांस तिसरें कन्यारत्न झालें. त्यांचें नांव ‘ ललितादेवीबाई ’ असें आहे.

मिति चैत्र वद्य २ शके १८२५ त यांची स्वारी महायात्रेस रवाना झाली. जातांना टांकळीहून मुंबई, बडोदा, अजमीर, लखनौ, कलकत्ता, इत्यादि शहरें पहात पश्चिमधाम श्रीद्वारका पुरी, पुष्कराज, प्रयाग, गया, काशी, इत्यादि ठिकाणीं जाऊन राजमहेंद्री, बिजवाडा, मद्रासमार्गें श्रीरामेश्वरास जाण्याचा बेत होता; इतक्यांत श्रीमती सौभाग्यवती राणी रेणुकाबाई साहेब यांची प्रकृति बिघडल्याचें वर्तमान तारेनें कळतांच पुढें जाण्याचा बेत रहित करून हैदराबादेस आले. राणीसरकारची प्रकृति अनेक उपायांनीं मोठमोठे डाक्टर, वैद्य यांच्यांनीं बरी न होतां अधिकच बिघडून शेवटीं मिति



चित्रशाळा प्रेस पुणें.

१ ललिताबाई २ श्री० राजे शामराज बहादूर ३ श्री० राजे लक्ष्मणराव महाराज ४ श्री० राजे त्रिंबकराज. ५ ललिता आंबाबाई.

ज्येष्ठ वद्य ९ रविवारीं सायंकाळीं ६ वाजण्याचे सुमारास आपलीं आवडतीं लेंकरें पतीच्या स्वाधीन करून व त्यांच्या सांगोपनाविषयींचा निरोप सांगून अशाश्वत इहलोक सोडून अक्षय सुखासाठीं परलोकीं जाण्यास मार्गस्थ झाल्या.

## श्लोक.

॥ सपादाष्टा दशशते शकेंद्रे शोभनेरवौ ॥
॥ पंचम्यां ज्येष्ठ कृष्णेस्ते रेणुका दिवमारुहत् ॥ १ ॥

पुढें दोन महिन्यांनीं मिति भाद्रपद शुद्ध २ सोमवारीं श्रीमंतांचा द्वितीय विवाह पुण्याचे रा. रा. बळवंत रावजी कानगो यांच्या कन्येशीं झाला.

यानंतर श्रीमंत युवराज राजा शामराज बहादुर यांच्या उपनयनाचा ( व्रतबंधाचा ) निश्चय झाला. ज्योतिषी लोकांचे संमतीनें वैशाख वद्य ९ शके १८२६ बुधवारीं साडेबारा घटकेंच्या सुमुहूर्तावर संस्कार झाला. या मुंजीच्या संबंधानें कांहीं विशेष लिहून ग्रंथ वाढवावा असें माझ्या मनांत नाहीं. तथापि कांहीं गोष्टी अशा झाल्या कीं, खरोखर त्या अदृष्टपूर्व होत्या. त्या या स्थळीं लिहिल्यावांचून रहावत नाहीं.

या मुंजीची तयारी सुमारें चार महिन्यांपासून चालली होती. कित्येक मजूर लोक दोन तीन महिन्यांपासून साहित्याची तयारी करीत होते.

**अक्षत** ( आमंत्रणें ):—स्वतः राजेसाहेब बरोबर दीड दोनशें मंडळी घेऊन दोन महिन्यांपासून शहरभर अक्षत देण्यास फिरत होते. यांचा हेतु असा होता कीं, निदान स्वज्ञातीपैकीं

एकही घर आमंत्रणावांचून राहूं नये, ह्मणून अगदीं आगंतुकाचे घरापासून तों थेट अमीर उमरावांचे घरापर्यंत कोणाचेंही घर राहिलें नाहीं.

**पोषाक**( जोडा ):—राजेसाहेबांनीं या प्रसंगीं आपल्या पदरचे सर्व नौकर, चाकर, ब्राह्मण, भिक्षुक, शागीर्द इत्यादि कोणताही मनुष्य न वगळतां झाडून एकंदर लोकांस व तसेंच गांवोगांवांहून सुमारें एक हजार लग्न चिठ्या पाठवून बोलावून आणलेल्या लोकांस त्यांचे त्यांचे योग्यतेप्रमाणें पोषाक दिले. या पोषाकांत तीन वर्ग ( केवळ उच्चवर्ग सोडून ) केले होते. याप्रमाणें सुमारें तीन हजार लोकांस पोषाक दिले. उच्चवर्गापैकीं जे अमीर उमराव त्यांस हजार रुपयांपासूनचे पोषाक दिले. तसेंच राजेसाहेबांस ही थोर थोर लोकांकडून आहेर आले.

**जलसा**( नाचरंग ):— मुंजीच्या दिवसांपासून पुढें महिनाभर नाचरंग चालूच होता. आमंत्रण दिलेले लोक आपापल्या सवडी-प्रमाणें येतील असें जाणूनच श्रीमंत लोकांचे घरीं इतके दिवस नाचरंग चालू ठेवावा लागतो. तसेंच मुसलमान लोकांकरितां जलसे निराळेच केले होते.

**मेजवान्या**:— मुंजीच्या अगोदर पंधरा दिवसांपासून एकसारखें ब्राह्मण भोजन चाललें होतें, तें मुंज आटपून जहागिरींतून जे लोक बोलाविले गेले होते त्यांस परवानगी मिळेपर्यंत ह्मणजे सुमारें वीस पंचवीस दिवसपर्यंत चालूच होतें. भोजनास आमंत्रितांवांचून पाहिजे त्यांस येण्यास मोकळीक होती. बाहेर गांवांहून आलेल्या लोकांपैकीं जे लोक संस्कारीं भोजन करीत नसत त्यांच्या घरीं बरो-

बरच्या मंडळीस पुरे इतका पक्वान्नी शिधा पोंचविला जात असे तसेंच गाड्या, घोडीं वगैरे जीं जनावरें लोकांबरोबर होतीं त्यांच्या दाण्याचाऱ्याचीही व्यवस्था ठेविली जात असे. मुख्य शहरांतील लोकांस ज्या मेजवान्या दिल्या त्यांचें वर्णन थोडक्यांत करणें ह्मणजे निदान दहा पांच पानें मजकूर आल्यावांचून रहाणार नाहीं. तथापी वाचकांस कंटाळा न यावा ह्मणून थोडक्यांत सांगतोंः— शहरांत जितकीं ब्राह्मणांचीं घरें आहेत त्या सर्वांस आमंत्रण देऊन भोजनास बोलाविलें होतें. भोजनसमारंभास एक थोरला भव्य मंडप घालून पाट, रांगोळ्या, प्रत्येक केळीच्या पात्रास समई, उद-बत्ती, अशा थाटाची तयारी करून प्रत्येक पंक्तींत दहा पांच पंखे-वाले वारा घालण्याकरितां फिरत होते.

महाराजांच्या पदरचे सर्व मुत्सदी, नौकर, चाकर, आपआपल्या कामांत इतके तयार असत कीं, भोजन समयीं किंवा अन्य प्रसंगीं अमुक मनुष्यास अमुक पदार्थाची उणीव आहे असें मुळींच होऊं दिलें नाहीं.

**वरात** (भिक्षावळीची मिरवणूक):—प्रथमतः संस्थानचा जरीपटक्या चा निशाणाचा हत्ती, त्या मागून तैनातीस आलेले सरकारी स्वार नंतर तैनाती शिबंदी, नंतर संस्थानचे स्वार व शिबंदी, नंतर शृंगार-लेले शोभेचे दहा बारा हत्ती, नंतर नौबतीचे हत्ती, नंतर खास संस्थानची झालरदार पालखी, नंतर शृंगारलेले शोभेचे घोडे, नंतर भाले, बलम् घेतलेले शिबंदी, त्याच्या नंतर अरब, रोहिले, शीख, या लोकांचीं पलटणें, नंतर घोड्यावरील ब्यांडबाजा, ताशे, आठ दहा वाजंत्र्यांचे जोड, त्यानंतर वरातींत मिरवण्याकरितां आमंत्रण दिलेले शहरांतील बडे बडे लोक, सरकारी मानकरी, अधिकारी,

शेट, सावकार, इत्यादि हजारों मंडळीसह राजेसाहेब स्वतः स्वारी बरोबर चालत होते. नंतर याच्या मागून राजेसाहेबांचा खास आवडता घोडा पहेलवान नांवाचा आहे, तो उत्तम शृंगारून त्यावर श्रीमंत युवराजांची स्वारी, छत्र, आफताबागिरी, चामर, मोर्चेल इत्यादि राजचिन्हयुक्त बसली होती. स्वारीच्या रक्षणाकरितां पुढें नागव्या तलवारीचे सिद्दी, बाजूला बोचेवाले, व मागें हत्यारबंद शिक, युवराजांचे मागें जवळच शेंपन्नास बायका करा घेऊन चालल्या होत्या. त्यांच्या रक्षणाकरितां सरकारी अडदलीचे स्वार होते. नंतर या संस्थानचा शृंगारलेला अंबारीसह खास हत्ती. याप्रमाणें वरात नळे, चंद्रज्योती, बाण, तारामंडल, गोळे, वगैरे नाना प्रकारचें दारुकाम जागोजागीं सुटत सुटत राजवाड्यांतून निघून चार मिनोऱ्यांवरून राजा शिवराज बहादुर यांच्या देवडी वरून मीरजुमल्याचे तळ्यावरून, राजा चंदुलालचे देवडींत स्वारी आली. त्या ठिकाणीं मदारूल महाम ( मुख्य प्रधान ) महाराजा सर कृष्ण प्रसाद बहादुर यांची स्वारी ही वरात पहाण्यासाठीं उभी होती. उभयतांचा सलाम झाला. त्याही ठिकाणीं आतषबाजी सुटून श्रीकाशी विश्वेश्वराचे देवळावरून स्वारी राजवाड्यांत परत आली. ही मिरवणूक सुमारें तीन चार तास मिरवत होती. मिरवणारे सर्व लोकांच्या गळ्यांत कमालखानी हार होते.

ही शोभा पाहून असें मनांत येतें कीं, जुन्या काळांतील वर्णन सोडून दिलें तरी पेशवाईंतील ज्या गोष्टी पुस्तकांतून आह्मी वाचतों, व वृद्धलोकांचे तोंडून ऐकितों, त्या आज प्रत्यक्ष आमच्या दृष्टीस श्री राजेसाहेबांच्या पुण्यप्रतापाचें फळ ह्मणून पडत आहेत. धन्य आमच्या जीविताची कीं, आह्मी ही शोभा पहाण्यास आज हैदराबादेस आहों.

या प्रसंगीं राजेसाहेबांनीं आलेल्या मंडळींचें स्वागत केलेलें पाहून असा मनांत विचार येतो कीं, अलीकडील लोकांत भीड मर्यादा वगैरे फारच विरळा दिसते, व आमच्या राजेसाहेबांस ऐश्वर्य, तारुण्य इत्यादि गोष्टी अनुकूल असून या कालाप्रमाणें विद्याहि आहे; मग या ठिकाणीं अमर्यादत्वास काय उणें असावें? परंतु नाहीं; तारीफ करण्याची गोष्ट ही आहे कीं, त्या प्रसंगाचा यांचा विनय फारच वर्णनीय होता. मी आणखी एक गोष्ट वाचकांस वाचण्याची तसदी देतों. त्यांत राजेसाहेबांचें स्वभाववर्णन करीत नाहीं. जगांत गुणावगुण निरनिराळे किंवा मिश्रित असे आढळतात. त्याप्रमाणें प्रत्येकाचे स्वभावांतही गुणावगुण हे असणारच; तेव्हां त्यांचें वर्णन करून वृथा स्तुति करण्याचें सोडून एकच गोष्ट सांगतों कीं, राजे साहेबांस व्यसन कोणत्याच गोष्टींचें नाहीं. फार तर काय हे भोजनोत्तर सुपारी किंवा नुसती लवंग देखील सेवन करीत नाहींत. केवढा मनोनिग्रह हा !!! असो.

राजे साहेबांची स्वारी मिति अधिक ज्येष्ठ वद्य ११ गुरुवारीं पूर्वीची महायात्रा पूर्ण करण्यासाठीं मुंबईमार्गें रवाना झाली. प्रथम जुनागड ( दत्तस्थान गिरिनार ) या ठिकाणीं दर्शन घेऊन, तेथून प्रभासक्षेत्र ( सोरटीसोमनाथ ), सिद्धपूर ( मातृगया ), अहमदाबाद, बडोदें, उज्जनी ( अवंतिका ), चित्तोरगड, जयपूर, दिल्ली, मायापुर, ( हरिद्वार ), इत्यादि तीर्थें-क्षेत्रें पहात पहात, श्रीक्षेत्र पुण्यस्तंभ ( पुणतांबें ) या ठिकाणीं गंगागोदावरीची भेट करून नंतर दक्षिणेस श्री बालाजी (वेंकटेश), दोन्ही कांची, मधुरादर्शन करून श्रीरामेश्वराचे यात्रेस गेले. तेथुन मद्रास मार्गें सुमारें दीड महिन्यानें हैदराबादेस आषाढ शुद्ध ६ सोमवारीं येऊन दाखल झाले.

श्रीमंतांनीं दिल्ली दरबारांतून परत येतांना एक मोटारकार आणली आहे. कधीं कधीं या गाडींत बसून हवा खाण्याकरितां शहरांत व शहराबाहेर जाण्याचा परिपाठ आहे. एक वेळ श्रीमंतांचे मनांत असें आलें कीं, मोटारकारचा वेग किती प्रमाणांत चालवितां येईल? हा अनुभव पहाण्याकरितां स्वारी कार्तिक शुद्ध ७ सोमवारीं आपल्या पूर्वजांनीं स्थापिलेल्या श्रीशामराजेश्वराच्या दर्शनास शाम-राजपुरास रवाना झाले. ( हा गांव हैदराबादेपासून सुमारें ८९ मैलांवर आहे. ) निवाल्यापासून त्या ठिकाणीं सुमारें नऊ तासांनीं पोंचले. त्या ठिकाणीं थोडी विश्रांति घेऊन त्याच गाडीनें परत येण्याचा बेत होता. परंतु लहानशी आगगाडी त्या खेडेपाड्यांतील लोकांस ऐकूनही माहीत नव्हती; ती गाडी हैदराबादच्या कोणी राजानें आणली आहे. हें वर्तमान लोकांत तावडतोब प्रसिद्ध झालें, व ती पहायास हजारों लोकांची गर्दी जमूं लागली. तेव्हां प्रेक्षकांचा उत्साहभंग करून गाडी आणतां येईना, आणि इकडे तर श्रीमंतांस येण्याची त्वरा होती. मग टप्यां टप्यांनीं घोडे ठेवून तिसरे दिवशीं सायंकाळीं स्वारी हैदराबादेस येऊन दाखल झाली.

यांच्या जहागिरीचें क्षेत्रफळ सुमारें दोनशें पंच्याहत्तर चौरस मैल आहे. लोकसंख्या सुमारें बावन हजार आहे. जहागिरीचें उत्पन्न सुमारें अडीच लक्ष आहे. जहागिरीचे गांवांची संख्या एकशें एकवीस आहे.

मिति पौष शुद्ध १० रविवारीं श्रीमंतांची स्वारी मुंबईस औद्योगिक प्रदर्शन पहाण्याकरितां आपल्या बरोबरच्या निवडक लोकांसह गेली होती. तेथें चारपांच दिवस राहून स्वारी परत आली.

